# करार एका ताऱ्याशी


कुसुमाग्रज

संपादक
वसन्त सं. पाटील





मेहता पब्लिशिंग हाऊस

■ करार एका ताऱ्याशी / कवितासंग्रह
कुसुमाग्रज
संपादन : वसंत पाटील

■ प्रकाशनाचे हक्क
मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.

■ प्रकाशक
सुनील अनिल मेहता,
मेहता पब्लिशिंग हाऊस,
१२१६, सदाशिव पेठ,
पुणे. © ४७६९२४

■ अक्षरजुळणी
एच्. एम्. टाईपसेटर्स,
११२०, सदाशिव पेठ,
पुणे ३०.

■ मुद्रक
संगम प्रेस प्रा. लि.,
कोथरूड,
पुणे.

■ प्रथमावृत्ती
सप्टेंबर, १९९७

■ मुखपृष्ठ
चंद्रमोहन कुलकर्णी

■ किंमत
पन्नास रुपये

■ ISBN 81-7161-727-1

■ ISBN 81-7161-727-1

*मी चोरल्या रवीच्या*
*काही प्रकाशधारा*
*तिमिरात शक्य झाली*
*इतुकीच रोषणाई*

— कुसुमाग्रज



# निवेदन

कविश्रेष्ठ कुसुमाग्रजांच्या काव्याचा मनात भरणारा विशेष म्हणजे त्यांची आकाशसंदर्भातील कविता.

ही कविता मला प्रथमपासूनच आकृष्ट करीत आली आहे. या संदर्भातील त्यांची निवडक कविता संकलित करावी, असा मी संकल्प केला. कविराजांनाही तो आवडला.

त्यानंतर २७ फेब्रुवारी, १९९६ रोजी 'कुसुमाग्रज तारा' आकाशात झळकू लागल्याची स्नेहपूर्ण घटना घडली. त्यामुळे माझ्या संकल्पाला अधिक गती मिळाली. या संकल्पाच्या पूर्तीसाठी मी 'जीवनलहरी' ते 'महावृक्ष' या कुसुमाग्रजांच्या काव्यसंग्रहांतील निवडक कवितांचा गुच्छ तयार केला. याबद्दल मी या संग्रहांचे प्रकाशक कॉंटिनेंटल प्रकाशन व पॉप्युलर प्रकाशन यांचा मनापासून आभारी आहे.

संपादक

## अनुक्रम

# प्रकाशाचा लावण्योत्सव

**उ**त्कृष्ट काव्याचे विवेचन करताना मॅथ्यू अर्नोल्ड याने म्हटले आहे :

'उत्तम काव्यात मन घडविण्याचे, त्याला आधार देण्याचे व आनंद देण्याचे सामर्थ्य असते. अशी शक्ती इतरत्र लाभत नाही.'

हे उद्गार कुसुमाग्रजांच्या कवितेविषयी यथार्थ ठरतात. ज्या काव्याला अशा प्रकारचे 'मिशन' असते, ते श्रेष्ठ ठरते. कुसुमाग्रजांच्या कवितेला असे आन्तरिक 'मिशन' स्वभावतः गवसले आहे, असे म्हणता येईल. निराशेच्या आणि दुःखाच्या अंधारातून प्रकाशाची वाट दाखविण्यासाठी ती अवतरली आहे. 'कवितेने मला जगविले,' असे त्यांनी स्वतःच एके ठिकाणी म्हटले आहे. चोखंदळ वाचकही म्हणतील की, 'कुसुमाग्रजांच्या कवितेने आम्हांस जगविले आहे, तसे जागवलेही आहे.' एवढी विलक्षण ताकद पूर्वसूरींच्या काव्यात दिसली नव्हती, हे मान्य करायला हवे.

*काव्य नव्हे शब्दांचा सुंदर नादमधुर मेळ.*
*अर्थचमत्कृतिचाही नोहे डोंबारी खेळ–*

*(बी)*

हे कुसुमाग्रजांना चांगले अवगत होते. म्हणून ते कधी शब्दक्रीडेच्या नादी लागले नाहीत. त्यांच्या शब्दांना ओढ होती जीवनाची. ज्ञानपीठ–स्वीकार–सोहळ्याच्या प्रसंगी त्यांनी आपली काव्यविषयक भूमिका मांडली होती :

'काव्याची अंतिम बांधिलकी असते ती जीवनाशी, शब्दांशी नव्हे, कल्पनेच्या विलासांशी नव्हे... काव्याच्या दृष्टीने सागराची अथांगता जेवढी खरी, तेवढाच खरा सामाजिक व्यवस्थेतील अन्याय. कविता प्रचार करीत नाही, पण संस्कार अवश्य करते... संस्कार म्हणजे कवीच्या अनुभूतीतून परिसराशी निर्माण होणारा संवाद.'

या त्यांच्या शब्दांतून त्यांच्या काव्याची प्रकाशयात्रा कोणत्या दिशेने जात आहे, याची स्पष्ट कल्पना येईल. थोर सारस्वत वि. स. खांडेकर यांनी म्हटले आहे :

'टिळक जसे फुलामुलांचे कवी होते, किंवा गोविंदाग्रज' जसे कल्पनारम्य प्रणयाचे कवी होते, तसे कुसुमाग्रज हे मानवतेचे कवी आहेत.'

ते अगदी यथार्थ आहे. पण त्यांच्या कवितेतून माणसाला निराशेच्या अंधारात मनोबल

मिळते, प्रकाश दिसतो, म्हणून कुसुमाग्रजांना 'प्रकाशाचे कवी' म्हणावेसे वाटते.

कुसुमाग्रजांची कविता वाचल्यावर रसिकाच्या मनात जिजीविषा (जगण्याची इच्छा) व जिगीषा (जिंकण्याची इच्छा) उफाळून येतात. जीवन जगण्यासाठी प्रेरणा, शक्ती आणि जिद्द या जिजीविषेतून स्फुरतात, तर जिगीषा प्रतिकूलतेवर, निराशेवर मात करण्यासाठी बळ देते, जीवनास अर्थ देण्यासाठी वाट दाखविते. हे पूर्वपरंपरेहून त्यांच्या कवितेचे पृथगात्मत्व मानायला हवे. 'तस्माद् युध्यस्व भारत' हा गीतेचा संदेश त्यांच्या कवितेतून पदोपदी मिळतो. माणुसकीचे प्रेम, स्वार्थत्याग, आत्मसमर्पण, अशारीर उदात्त प्रेम, स्वप्नरंजनाहून प्रखर असे वास्तवदर्शन, जीवनसंमाग्रात शेवटपर्यंत धैर्याने लढत राहणे, यांत ते जीवनाची सार्थकता मानतात. हे मानवाचे दैवी गुण जोपासण्यासाठी त्यांच्या शब्दांची तेजस्वी वाटचाल सुरू आहे.

रविकिरण मंडळाच्या काव्यनिर्मितीच्या पार्श्वभूमीवर कुसुमाग्रजांची कविता अनेक दृष्टींनी आकृष्ट करते. 'रविकिरण' असे मंडळाने नाव घेतले आणि सप्तर्षींचे बोधचिन्ह घेतले खरे; पण प्रत्यक्षात 'रविकिरण' दिसले नाहीत व सप्तर्षीही झळकले नाहीत. कुसुमाग्रजांच्या कवितेत मात्र केवळ रविकिरण तळपले नाहीत, तर साक्षात सूर्यही प्रकाशला व नुसते सप्तर्षी झळकले नाहीत, तर अथांग तारकाविश्व झळकताना दिसले. त्यांनी सूर्याला नुसते अभिवादन केले नाही, तर त्याला आवाहनही केले. अतिदूरस्थ तारकासंभाराशी जवळचा संवाद साधला. पृथ्वीप्रमाणे त्यांची कविताही अनेक रूपांनी, प्रकारांनी सूर्याभोवतीच परिक्रमा करीत राहिली, हे त्यांच्या काव्याचे पृथगात्मत्व आहे.

काळाचे व कवीचे जुळलेले नाते हे कुसुमाग्रजांच्या यशाला मोठ्या प्रमाणात कारणीभूत झाले, हे प्रा. शंकर वैद्य यांचे म्हणणे काहीसे चिन्त्य वाटते. हे नाते केवळ योगायोगाने जुळून आले होते. तसे नसते, तरी कुसुमाग्रजांच्या कवितेने जनमानसात गौरवाचे स्थान मिळविलेच असते. 'जन्मासाठी हटून केव्हा बसली नव्हती' असे कवीनेच आपल्या निर्मितीविषयी म्हणून ठेवले आहे. त्यांची काव्यनिर्मिती 'स्वयंभू'च आहे. स्वातंत्र्यपूर्वकाळात पौरुष गाजविण्यासाठी स्फूर्ती देणारी अशी जी त्यांची उत्स्फूर्त देशभक्तिपर रचना आहे, ती सोडून अनेक स्वतंत्र दिव्यभव्य विषय असलेली त्यांची कविता वाचकाच्या हृदयाचा ठाव घेणारी अशीच होती. विचारांचे नावीन्य व भावनांची उदात्तता यांचा अभिनव आविष्कार करणारी त्यांची शैली नवे युग अवतरल्याची ग्वाही देणारी होती.

कुसुमाग्रजांच्या समग्र काव्यात मनात भरणारा विशेष म्हणजे, त्यांची प्रकाशपूजा. या पूजेसाठी ते सदैव आपल्या लाडक्या सूर्यदैवताकडे धाव घेतात, त्याचे सहचर चंद्र, तारे, नक्षत्रे आणि या सर्वांना उदरात घेणारे अथांग आकाश यांच्याकडे ते नतमस्तक होऊन जातात. त्यांची कविता सूर्यमय, उषामय आणि आकाशमय आहे, असे वाटू लागते. ऋग्वेदाचा अभ्यास करताना वेदमहर्षी मॅक्स म्युलरला असेच वाटत होते. वेदातील वेगवेगळ्या देवतांच्या मूळ स्वरूपांत या पंडिताला उषासूर्यांचेच दर्शन झाले. कुसुमाग्रजांनाही ठायीठायी असेच दर्शन घडलेले दिसते. अंगणात उतरलेला पक्षी पाहून 'उषःकालच्या आकाशाचा,

पडला होता, तुकडा खाली' असे त्यांना वाटते. त्यांचे कोकिळगाणे देखील पहाटताऱ्यांच्या मेण्यात बसून केशरकिरणांच्या पडद्याआड लपलेले असते. असा प्रकाशाचा षड्ज त्यांच्या काव्यसंगीताला निरंतर व्यापून आहे.

ही प्रकाशपूजा कुसुमाग्रजांनी आपल्या कवितेच्या उषःकालीच आरंभिलेली दिसते. 'जीवनलहरी' या त्यांच्या पहिल्याच भावरचनेत ते सूर्याचे स्वागत करताना म्हणतात :

*– आला रथ उदयाचलि*
*ज्वालेसम झळके ध्वज*
*उधळी ही चक्रगती*
*नीलावर आरुण रज*
*वेदांनी अभिवादन*
*केले ज्या, तेजोधन*
*तिमिराच्या वेशीतुन*
*धरतीवर येत पुन्हा ! (१४३)*

या स्वागतगीतात प्रकाशदात्या सूर्याने अंधाराच्या महाद्वारातून धरतीवर प्रवेश केला आहे. इथे काळ्याकाळ्या अंधाराला सूर्याचे प्रवेशद्वार म्हटले आहे. सूर्याने अंधाराला नष्ट केले, असे म्हटलेले नाही. उलट, तमाच्याच भव्य वेशीतून, प्रकाशप्रभू डौलाने धरतीवर आला, असे कवी म्हणतो. ते लक्षणीय आहे. उदयासाठी अंधार हवाच, इथे अंधाराला कवी तुच्छ लेखीत नाही. 'रात्रीच्या गर्भात उद्याचा असे उषःकाल' या अजरामर ओळीत देखील रात्र ही उषःकालाची जननी आहे, असे सूचित केले आहे. तिमिरातून तेजाकडे जाताना ते अंधाराचा द्वेष करीत नाहीत. अंधाराचा ते स्वीकार करतात. सागराच्या लहरींवर विजेच्या दिव्यांच्या प्रकाशाचा खेळ पाहताना 'तमाला जणू अग्निचा ये फुलोरा' अशा सुंदर उत्प्रेक्षेने अंधाराला गौरवितात. तर 'विशाखे'च्या पहिल्याच कवितेत दीपस्तंभाचे वर्णन करताना-

*'काळोखावर खोदित बसला तेजाची लेणी'*

असे चित्रमय दृश्य नजरेसमोर उभे करतात. अंधाराचा विस्तीर्ण कातळ नसेल, तर त्यावर तेजाची लेणी कशी खोदता येणार? तेव्हा प्रकाशाच्या आगमनासाठी अंधार हवाच, असा कुसुमाग्रजांचा आग्रह आहे.

एका जीवनलहरीत ते म्हणतात.

*–पेटवावयास दिवा*
*हा असाच तिमिर हवा*
*जावया अपार्थिवात*
*धरतीचा शाप हवा*

दिव्यतेचा साक्षात्कार होण्यासाठी मातीच्या दुर्बलतेचा शाप हवा, यातूनच खरा मानव उदयास येईल, असे ते ठामपणे म्हणतात. अंधाराशी ते मैत्री देखील करतात. कारण प्रकाशोदयासाठी अंधार आवश्यक आहे, अशी त्यांची धारणा आहे. म्हणून तर 'पाहुणा' (म.वृ. ६९) या कवितेत कवीने प्रकाश-काळोखांची भेट मोठ्या चमत्कृतिपूर्ण व नाट्यमय रीतीने घडवून आणली आहे. शेवटी 'सांजपहाटेला, भेटू जरा वेळ' असे अंधाराला प्रकाशाने तिथे वचन दिले आहे.

पण अंधाराला दूर घालविण्यासाठी संघर्ष करावाच लागतो. अंधार-प्रकाशाचा हा सनातन संघर्ष कवीने अनेक प्रकारांनी, अनेक ठिकाणी उभा केला आहे. अंधार-प्रकाश हे प्रतीकरूपाने कवीने योजिले आहेत. सत्प्रवृत्तींचा असत्प्रवृत्तींशी शाश्वत संघर्ष त्यांनी प्रभावीपणे मांडला आहे. शेवटी प्रकाश हा अंधारावर मात करतोच.

'जीवनलहरी'पासून उदयास आलेली ही प्रकाशोपासना हळूहळू आन्तरिक बनत चाललेली दिसते. म्हणजे हा प्रतिभेचा प्रवास स्थूलाकडून सूक्ष्माकडे चाललेला दिसतो. 'विशाखे'त 'हा काठोकाठ कटाह भरा' या कवितेत प्राकृतिक सूर्यवर्णन तर येतेच, पण ते सांकेतिक नाही. 'ज्वालांत जळू द्या तम सारा' असे कवी अभिनिवेशाने आवाहन करतो; पण हा झाला बाह्यसृष्टीतला अंधार. शेवटी 'प्रकाशप्रभू'चे स्वागत करून कवी त्याची आळवणी करतो :

*या माझ्या हृदयावर देवा,*
*पवित्र अपुले पाउल ठेवा*
*अद्यापी अंधार रात्रिचा, रेंगाळत अंती*

इथे कवी मनातल्या अंधाराकडे येतो.

इंग्रजी कवितेच्या धर्तीवर निसर्गगीत प्रथम लिहिले केशवसुतांनी. 'निसर्गप्रेम, निसर्गोपासना व निसर्गसौंदर्याचा साक्षात्कार' हे बालकवींचे क्षेत्र. केशवसुत केवळ निसर्गाचे चित्रण करीत बसले नाहीत. ते करीत असताना मानवाच्या दुर्बलतेचे, तर कधी वैयक्तिक अपूर्णतेचे विचार त्यांच्या मनातून उफाळून येतात. (पाहा : पुष्पाप्रत). रेव्ह. टिळकांना मात्र निसर्गातून तत्त्वज्ञानपर प्रवचने ऐकू येतात. गोविंदाग्रजांनी देखील बालकवींप्रमाणे निसर्गगीते लिहिली. कुसुमाग्रजांच्या काव्यात मात्र निसर्गचित्रणासाठी निसर्गवर्णन क्वचित आढळून येते. केशवसुतांप्रमाणेच त्यांचे मन निसर्गलुब्ध असूनही सामाजिक दुःखाचे चिंतन करीत बसते. याचे कारण कुसुमाग्रजांच्या मूळ प्रकृतीत आहे. निसर्ग हा कवीला बालकवींप्रमाणे प्रिय नसावा. वनात रमण्यापेक्षा मानवाच्या मनात रमणे त्यांना अधिक आकृष्ट करते. रानावनांतील हिरवाईत रमण्यापेक्षा माणसाच्या मनातील गहराईत हिंडणे त्यांना आवडते. कुसुमाग्रजांना निसर्गाची ओढ नाही, असे मला म्हणावयाचे नाही. निसर्गातील वृक्षवेलींच्या लास्याकडे पाहण्यापेक्षा त्यातील भीषणता-उग्रता कविमनाला अधिक मोह घालते. तसे 'कार्तिकातील

मधुर चांदणे व आषाढातील विजांचे तांडव' त्यांच्या मनात एकत्र नांदताना दिसतात. वनश्रीच्या हिरवाईपेक्षा गगनाची गहन निळाई त्यांच्या हृदयाला आवाहन करते. खरे म्हणजे, कुसुमाग्रजांच्या निसर्गप्रेमाच्या सुवर्णभांडारात गहननील आकाश व त्यातील चिरंतन रहिवासी सूर्य, चंद्र, तारका यांनाच अत्यंत गौरवाचे स्थान आहे. कारण या प्रकाशविश्वात गूढता, गंभीरता व उदात्तता एकत्र नांदत आहेत. सूर्याचा आग ओकणारा प्रखर प्रकाश, चंद्राची शीतल प्रभा व ताऱ्यांचा, नक्षत्रांचा 'आर्द्र दयाशील' मंद विलास ही सारी मोह घालणारी आहेत. वैदिक ऋषींच्या मनांवरही असाच सृष्टीच्या प्रचंडतेचा, तेजस्वितेचा नि गूढतेचा गाढ प्रभाव पडला होता. नक्षत्रांकित आकाश तर ऋषींच्या प्रतिभेला जबरदस्त आवाहन होते; तसेच, कुसुमाग्रजांच्या प्रतिभेलाही. कुसुमाग्रज प्रकाशाच्या प्रभेच्या बहुरंगी तरल छटा अत्यंत समर्थपणे रंगवितात. त्यांनी एके ठिकाणी स्वरांचे वर्णन केले आहे :

*मला हवे स्वर लाल तांबडे*
*कठोर दाहक रणशाली*
*धवल निळे वा मयूरपंखी*
*तलम मुलायम मखमाली (हिम. ७७)*

प्रत्येक स्वराला वर्ण (रंग) असतो, असे शार्ङ्गदेवाने 'संगीत रत्नाकरा'त म्हटले आहे (१.५४-५५). या विधानाचा इथे प्रत्यय येतो. या ओळींतील स्वरांचे वर्णन प्रकाशाच्या क्षणोक्षणी बदलणाऱ्या विविध छटांचे रंगचित्र आहे, असे वाटू लागते. स्वर हा श्रवणाचा विषय, पण कुसुमाग्रजांनी आपल्या प्रतिभास्पर्शाने दर्शनाचा आणि स्पर्शनाचा विषय बनविला आहे. स्वरांतही ते प्रकाश पाहतात. प्रकाशाच्या इतक्या अगणित प्रभांचे चित्रण मराठी कवितेत अन्यत्र क्वचित सापडेल. प्रकाशपूजेच्या ध्यासातूनच हे सुंदर रंग पाझरत आहेत, असे मनात येते. वैदिक कवींप्रमाणेच पूर्वक्षितिजावर सप्तरंग उधळत येणारी उषादेवी ही कुसुमाग्रजांना अतिशय प्रिय. या लावण्यवतीचा झगमगता प्रकाशोत्सव आपल्याला 'पालखी' या कवितेत दिसतो. (म. मा.-२५). मनाला रोमांचित करणारे हे दृश्य कवीने अगदी वेगळ्या थाटाने चित्रित केले आहे.

'विशाखे'तील 'उषःकाल', 'हिमरेषे'तील 'उषास्तवन' व 'पाथेया'तील 'उषासूक्त' यांत एकच निसर्गदृश्य विविध भावरम्य, पण भिन्नभिन्न आकार घेऊन उभे राहते. पहिल्या कवितेत उषेचे सांकेतिक वर्णन येत नाही. खरोखरीच यातील उषा म्हणजे महाकवीची समूर्त दिव्य वाणी! रात्र म्हणजे स्वप्नांचा खजिना. तो घाईगर्दीत घेऊन जाताना चुकून राहिलेले स्वप्न म्हणजे उषा, ही अप्रतिम उत्प्रेक्षा कवितेवर मुकुट चढवते; पण कविता समाप्त झाली, तरी, आपल्या धनसंपदेचे दान करून संन्यस्त झालेला पारिजात रसिकाच्या मनातून हलत नाही. कुसुमाग्रजांनी अगदी सहजपणे त्यागाचे ऐश्वर्य सूचित केले आहे. 'हिमरेषे'तील 'उषास्तवन' खास वैदिक ऋषीच्या थाटातले आहे. पण यातील काही उत्प्रेक्षा या कुसुमाग्रजांच्याच

प्रतिभेतून जन्मलेल्या आहेत :

*कालाचे बलिवर्द कोटि ते*
*अंध पिसाट तमी पळती*
*सुवर्णवलये फेकुन त्यांची*
*नियमित केलिस तूच गती.*

ही उत्प्रेक्षा स्तिमित करणारी आहे. 'पाथेया'तील उषासूक्त मात्र कुसुमाग्रजांचेच आहे. कुसुमाग्रजांच्या परिणतप्रज्ञेबरोबर यातील उषेची प्रभाही परिणत झालेली दिसते. अंधाऱ्या विश्वात 'सूर्याचा सांगावा' शिंपीत येणारी व अंती सूर्यात आपले अस्तित्व विसर्जित करणारी उषा, ही या श्रेष्ठ कवीचे अजरामर शब्दशिल्प म्हणजे साक्षात कैलासलेणेच आहे– महाकवीच्या प्रतिभेने घडवलेले! सगुणस्तवनाने प्रारंभ करून निर्गुणाकडे अलगद नेणारे हे उषेचे गाणे मराठीचे लेणे ठरावे, इतके ते सरस वाटते.

उषेनंतर उगवतो सूर्य. कुसुमाग्रजांच्या काव्याच्या केंद्रस्थानी हा सूर्य आहे. हा विराट तेजोगोल त्यांना काय देत नाही? तो सूर्य नवजीवन देतो, नवीन विचार देतो, प्रेम देतो, क्रांती घेऊन येतो. तो त्यांना तारतो, आधार देतो, आश्वासन देतो. 'विशाखे'तील सूर्य असे काही सौंदर्य व सामर्थ्य घेऊन आला, की आपली पृथ्वी त्याच्या प्रेमपाशात पडली! प्रीतीच्या साफल्यासाठी त्याची अहोरात्र प्रार्थना करू लागली.

'पृथ्वीचे प्रेमगीत' हे नुसते प्रेमगीत राहत नाही, तर प्रकाशमूर्ती सूर्याचे स्तोत्र होते. सर्व तारांगणाला इथे पृथ्वीचा मोह पडला आहे. चंद्र-ग्रह-तारे भाळले या मातीवर ही पृथ्वीची श्रेष्ठता. पण सूर्य मात्र दूरस्थ. जळण्यासाठीच त्याचे जीवन. तारे या मातीवर आसक्त तर सूर्य पूर्ण निरासक्त; तरी देखील पृथ्वीने आपले सर्व जीवन सूर्याला मनोभावे समर्पित केले. त्याच्या भोवती ती अहोरात्र परिभ्रमण करीत आहे. यातून कवीला मातीची चैतन्यमय प्रकाशाकडे असलेली स्वाभाविक ओढ सूचित करायची आहे. 'पृथ्वीचे प्रेमगीत' केवळ प्रीतिगान राहत नाही; तर ते कवीच्या प्रकाशपूजेचे सूक्त बनते.

सूर्योपासना तशी वेदकालापासून चालत आली आहे. परंतु या गीतात कुसुमाग्रजांनी सूर्याचे देवत्व आपल्या प्रतिभेच्या किमयेने पुसून टाकले व त्याला धरतीचा प्रियकर 'मित्र' बनविले. या कवितेतील भव्योदात्तता वेदातील 'द्यावापृथिवी'ची आठवण करून देणारी आहे. कुसुमाग्रजांनी अन्तराळातील चंद्र-नक्षत्रांच्या सुवर्णशृंखलांनी आकाश-धरतीला जणू प्रेमबंधनाने जखडून टाकले, कायमचे. पृथ्वीच्या प्रीतीची ज्योत केवळ यौवनात प्रदीप्त राहत नाही, तर नव्हाळीच्या मशाली विझल्यानंतरही प्रकाशत राहते. प्रेमाचे स्वरूप स्पष्ट करताना भवभूतीने म्हटले आहे :

'जिथे हृदयाला विश्रांती लाभते व ज्यातील रस वार्धक्यातही कमी होत नाही.'
(विश्रामो हृदयस्य यत्र जरसा यस्मिन्नहार्यो रसः– उ. रा. १.३९).

**सहा / करार एका ताऱ्याशी**

खऱ्या प्रेमात देहासक्ती फार थोडी असते. पण नंतर अपार्थिवताच प्रेमभावनेला व्यापून राहते, असे कवीने येथे सुचविले आहे.

सूर्याशी आपले मीलन कधीच होऊ शकणार नाही, हे ती जाणते. पण तिचा ध्यास चिरंतन आहे. यासाठी पृथ्वी सूर्याची दूरता सहन करायला तयार झाली आहे. तशी तिची भव्य तेजाची आरती निरंतर सुरू आहे. यातच मातीचे सार्थकत्व आहे, वैभव आहे. या कवितेतील शृंगार हा भोगशृंगार राहतच नाही. त्याचे भक्तीत रूपांतर झाले आहे, असेही म्हणता येणार नाही. शरीरता व भक्तीतील द्वैत ओलांडून इथे फक्त उरते पृथ्वीचे आत्मसमर्पण सूर्याच्या दिव्य रूपात! हे जसे पृथ्वीचे प्रेमगीत आहे, तसेच तिचे उत्कट विरहगीतही आहे. हा विरह तिने आनंदाने स्वीकारला आहे.

कुसुमाग्रजांचा सूर्यदेखील त्यांच्या उषेप्रमाणे स्थूलाकडून सूक्ष्माकडे नकळत प्रवास करीत चाललेला दिसतो. 'प्रकाशप्रभू'त या संक्रमणाची चाहूल लागलेली होती. आता सूर्य हा आत्मशक्तीचे प्रतीक बनला. मानवाच्या मनःसामर्थ्याचा ध्वज म्हणून फडकत राहिला. 'छंदोमयी'तला सूर्य असेच वेगळे रूप घेऊन उदयास आला. हा आकाशातला सूर्य वाटत नाही :

*रात्र मला ज्या तळ्यात टाकुन*
*नग्नपणाने निघून गेली*
*त्यातुन वरती*
*तटावरी आणून तयाने*
*पुन्हा दिले मज दिगन्त माझे*
*माझी धरती.*

सूर्याने कवीला निराशेच्या अंधारातून जागृत केले. काळोखातून दूर काढले व पौरुष गाजविण्यासाठी असीम दिगन्त दिले आणि जिच्या मातीत मानव हा घट्ट पाय रोवून उभा आहे, ती धरती दिली.

पृथ्वीला जशी सूर्याची उत्कट ओढ आहे, तशी सूर्यालाही पृथ्वीकडे धाव घ्यावीशी वाटते. तिच्याविषयी त्याच्या मनातही प्रेमादर आहे. 'पाथेया'त कवी म्हणतो :

*साक्षात् सूर्यही*
*विस्मित झाला*
*पृथ्वीच्या मातीतील*
*स्वयंसिद्ध प्रकाशाच्या*
*वसाहती पाहून*

या 'प्रकाशाच्या वसाहती' म्हणजे मानवी प्रज्ञेचे ऐश्वर्य व मानवी मनाची उत्तुंगता या दोहींचाही क्षणोक्षणी होत असलेला तेजस्वी विकास. हा पाहून ग्रहगोलांनाही वाटू लागले

की, त्यांची नीलाकाशातील यात्रा अर्थहीन आहे. मातीने मात्र विश्वहितकर सनातन तत्त्वे शोधून काढली. त्यामुळे पृथ्वी ही आमच्याहून अधिक प्रकाशमान झाली. असे असताना मानव मात्र करंटा. तो 'युगार्जित अर्थाच्या दीपमाळा' उद्ध्वस्त करायला निघाला आहे.

'छंदोमयी'तील दुसऱ्या सूर्यस्तोत्रात आकाशातील मेघांवर तेजाचे सिंचन करीत त्यांच्या जीवनाला आशय देण्यासाठी कवी सवित्याची प्रार्थना करीत आहे. अंतरंग उजळल्याखेरीज जीवनाला अर्थ प्राप्त होत नाही, असे कवी या कवितेतून सुचवितो. असे हे प्रकाशदात्या तेजाचे संक्रमण बाहेरून आत होत आहे. कारण माणसाच्या भग्न रित्या मनात आपले प्रकाशपद रोवण्याचे आवाहन कवी करीत आहे. इथेही 'आन्तरअग्नी' फुलवण्याचाच ध्यास दिसतो.

सूर्याप्रमाणे कुसुमाग्रजांचा चंद्र देखील अपूर्व रूप घेऊनच उदयाला येतो. विज्ञानाला गवसलेला चंद्र वेगळा आणि कवीच्या हृदयाकाशात उगवलेला चंद्र वेगळा. चंद्र हा जसे कवीच्या दुःखित मनाचे सांत्वन करतो, तसे त्याला आश्वासनही देतो. रात्रीच्या गाढ अंधारात गुदमरलेल्या मनाला कोण धीर देते?

*कडा ढगांची चांदवणारे*
*चंद्रकरांचे अस्फुट दर्शन (स्व. २९)*

या नभाच्या मानकऱ्याचे अभिनव वर्णन 'हा चंद्र' या कवितेत येते. विज्ञानचंद्रावर 'माकड-मानव-कुत्रा यांना जाता येते,' पण कवीचा चंद्र नटखट, ढोंगीसोंगी, बिलंदर व अनंतफंदी आहे. इथे चंद्राच्या आरस्पानी लावण्याची विविध रूपे कविप्रतिभेने अप्रतिम टिपली आहेत. केवळ शृंगाररसात डुंबणाऱ्या चंद्राला भग्न मंदिरावर चिंतनमग्न बृहस्पती बनविले आहे. तर–

*'कधी कुणाच्या मुक्त मनस्वी प्रतिभेसाठी*
*द्वारपाल होऊन जगाच्या*
*रहस्यतेचे द्वार उघडतो.'*

असे वर्णन केले आहे. 'विज्ञान हे माझ्या चंद्रसूर्यांवर आक्रमण करीत आहे, माझ्या आकाशावरही अतिक्रमण करीत आहे, शास्त्रज्ञांचे नभ वेगळे, माझे नभ वेगळे. माझ्या चंद्रसूर्यांसाठी मला लढायचे आहे', असे कवी आंतरिक श्रद्धाशक्तीने उद्गारतो. विज्ञानाने वाहून आणलेल्या चंद्राच्या राखी रंगाच्या मातीचा व दगडगोट्यांचा माणसाला खरोखरी काय उपयोग? परमात्म्याच्या मनातून जन्मलेल्या या बिलोरी चंद्रम्याने मानवी मनाला केवढे अमृतसंजीवन दिले आहे! म्हणून कवी आत्मविश्वासपूर्वक म्हणतो :

*येउद्या आकाशयाने वर्षुद्या श्वानावळी*
*दिग्फुलाची या न केव्हा भ्रष्ट होइल पाकळी.*

त्यांच्या आनंदाकाशात चंद्र कधीच मावळत नाही!

मानवी देह हा पंचमहाभूतांच्या मेळा असला, तरी कुसुमाग्रजांच्या मनात-

*तत्त्वे दोनच आहेत :*
*माती आणि आकाश*
*तुमच्यांत आणि*
*माझ्यातही*
*माती आली पृथ्वीतून*
*आकाश आले अवकाशातून*
*एक शिरले देहात*
*आणि दुसरे बसले मनात!*

तशी आन्तर-आकाशाची कल्पना उपनिषदांत येते. तैत्तिरीय उपनिषद म्हणते : (आधी सांगितल्याप्रमाणे) जे हे हृदयाच्या आत आकाश आहे, त्यात हा प्रकाशस्वरूप ईश्वर राहत आहे. (स यः एषोऽन्तर्हृदय आकाशः, तस्मिन् अयं पुरुषः मनोमयः). याआधी अथर्ववेदाने आपल्या सुप्रसिद्ध भूमिसूक्तात हीच कल्पना वेगळ्या रीतीने मांडली आहे. माणूस हा पृथ्वीचा पुत्र, पण त्याचे हृदय उंच आकाशात सत्याने वेढलेले आहे. (यस्या हृदयं परमे व्योमन्त्सत्येनावृतमृतं दिवि- १२-१-८) येथे दोन प्रतिभावन्तांचे विचारसाम्य चकित करणारे आहे. थोडक्यात, कुसुमाग्रजांच्या मते माणूस हा माती (जडतत्त्व) आणि आकाश (चैतन्य) एकत्र मिळून घडलेला आहे; पण जड व चेतन या दोहोंत सनातन संघर्ष सुरू आहे. म्हणून कवी म्हणतो–

*दोघे खूप भांडले*
*हिचे काळे त्याचे निळे*
*रक्त थोडे सांडले*

शेवटी देहात मातीच्या धर्मानेच आपले वर्चस्व प्रस्थापित केले. पण नंतर त्या मातीला परम खेद झाला, म्हणून 'द्वंद्व' या कवितेत शेवटी म्हटले आहे : मातीचे काळे करडे कण आकाशाला शरण जातात आणि त्याचेच निळेपण धारण करतात. माणसाला देहाचे जबरदस्त आकर्षण असले, तरी या देहाच्या दलदलीतून सुटून तो आकाशाकडेच झेपावत असतो. कुसुमाग्रजांच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाची आधारशिला म्हणजे प्रस्तुत कविता.

विख्यात जर्मन तत्त्ववेत्ता कांट एके ठिकाणी म्हणतो :

'मी जो जो अधिक वेळा अधिक एकाग्रतेने विचार करतो, तो तो दोन गोष्टींनी माझे मन वाढत्या आश्चर्याने आणि दडपणाने भरून येते. एक : माझ्या मस्तकावरील तारकांकित आकाश आणि दोन : माझ्या मनातील नीतितत्त्व.'

कुसुमाग्रजांचे वैशिष्ट्य असे आहे की, त्यांनी काटच्या तारकांकित आकाशाला खाली

उतरविले आणि माणसाच्या मनात स्थापित केले. प्रतीकरूपाने हे आकाश म्हणजे मानवी प्रज्ञेने अनेक शतकांतून जोपासलेली चिरंतन जीवनमूल्ये. कांटच्या मनातील नीतितत्त्वे (नैतिक आदेश) हीच कुसुमाग्रजांची जीवनमूल्ये असली पाहिजेत. ही तत्त्वे कांटने भिन्न मानली, कुसुमाग्रजांनी त्यांना एकरूप करून टाकले.

कुसुमाग्रजांच्या आकाशमातीने संघर्ष केला खरा; पण कवीने तो मिटवून टाकला– त्यांच्यांत सुसंवाद स्थापून. तशी मूलतः आकाशमातीची मैत्री 'विशाखे'पासूनच दिसते. कवीच्या विरहदुःखाने 'भासते भू तारकांच्या, आसवांनी ओलसर' असे वर्णन येते. यातून आकाशाची मातीकडे ओढ सूचित होते. त्यांची कविता मातीचे नभाशी नाते जोडण्यात कृतकृत्यता पावते. साधे कोकिळेचे गाणे कशी किमया घडवून आणते :

*कोकिळेने काय केले*
*गीत झाडाला दिले*
*आणि मातीचे नभाशी*
*एक नाते जोडले!*

मातीतून उगवलेल्या आणि तिच्यावर पोसलेल्या झाडाच्या पानांत दडून कोकिळेने गाणे गायिले! तिच्या स्वरमंडलाच्या उंच पोचणाऱ्या गानतरंगांतून निळ्या आकाशाला काळ्या मातीशी जणू जोडले गेले. मातीचे गायन आकाशाने आपल्या श्रुतींत साठवून ठेवले!

तारकांकित आकाशदर्शनाने कवी भारावून जातो खरा; पण 'विशाखे'त मात्र प्रखर वास्तवाचे भान त्याच्या मनास व्यापून आहे. तेव्हा त्याला तारकांची प्रभावळ क्षणभर भुलवीत होती. तो अभिनिवेशाने म्हणतो :

*नभि लागे तारांचे मोहळ*
*भुलवी त्यांची क्षणिक प्रभावळ*
*रात्रीचे हे आश्रित केवळ*
*या मशाल त्यावर धरा जरा*

नवविचारांच्या सूर्याला असे आवाहन करताना कवी तारकांची उपेक्षा करतो. कवीच्या या वृत्तीत नंतरच्या काव्यसंग्रहांत परिवर्तन झालेले दिसते. आता ते अंधारलेल्या एकांतात सदैव आकाशाशी व तारकांशी संवाद करताना दिसतात, तर कधी धरतीलाच ताऱ्यांशी बोलायला लावतात. त्यांची दूरस्थ तारकांशी दाट मैत्री केलेली दिसते. त्यांच्या मनात 'तारकादले उतरली' आहेत, असे वाटत राहते. 'एकच तारा समोर' या श्रद्धेने त्यांच्या कवितेची अखंड वाटचाल सुरू आहे.

कुसुमाग्रजांच्या काव्याच्या आकाशात एक सान पाखरू सदैव भिरभिरताना दिसते. 'जीवनलहरी'त सात-आठ ठिकाणी हे पाखरू नजरेस पडते. 'हे विहगा, आपण दोघे

मेघांच्या, ताऱ्यांच्या, अरुणाच्या सुंदर घरी जाऊ व तेथून गीते गाऊ. ती ऐकून हे माणुसकीशून्य जग हातातील धनुष्य टाकून देऊन विश्रांत होईल.' (जीवन. ५५-५६) असे कवी म्हणतो. कवीच्या गाण्याने माणूस दुष्टता टाकून शांत (द्वेषरहित) होतो. हे कवीच्या शब्दांचे सामर्थ्य! 'विशाखे'त हाच पक्षी 'नभनाविक' बनतो व 'किनाऱ्या'त कवीच्या घराच्या अंगणात तो वेलीवर येऊन बसतो. म्हणजे तो धरतीवर उतरतो. कवीने आता त्याच्याशी गाढ मैत्री केलेली दिसते. तो पक्षी त्याला आता 'आकाशाचा आशीर्वाद' वाटतो. हा पक्षी कुसुमाग्रजांच्या आकाशधरेला जोडणारा रंगीत रेशमी दुवा आहे. आकाशाचा संदेश पृथ्वीला सांगणारा व आपल्या गीतांनी पृथ्वीची आकाशाशी सोयरीक साधणारा हाच पक्षी 'मराठी माती'त कवीसाठी दिव्य प्रकाशाचे किरण चोचीत वाहून आणतो (पृ. २६). 'पहाटपक्षी' या दीर्घ कवितेत तो उषास्तवन गाताना दिसतो. काळोखातून उगवणाऱ्या सूर्याच्या तेजाची आरती तो गातो. या पाखराचा गती हाच धर्म आहे. आकाशातील त्याची रसयात्रा सफल झाली आहे आणि आता विसावण्यासाठी त्याने घरट्याकडे झेप घेतली आहे. 'छंदोमयी'त हेच सान पाखरू एकटेच सूर्यास्ताचे लालसर किरण चोचीत धरून दिशादिशांत तेजाची लागवड करायला सरसावले आहे. 'मेघ हासती' ही कविता उदात्त विचार आणि उत्तम निसर्गकाव्य यांचा नितांतमधुर मिलाफ आहे. या श्रेष्ठ कवीच्या गगनगामी प्रतिभेचे 'पक्षी' हे सुंदर प्रतीक आहे. आकाशदूत असलेला हा पक्षी व्योमधरेला आपल्या स्वरांनी एकत्र बांधणारा आहे.

कवीने जीवनात अगणित दुःखे सोसली– अगदी शांतपणे, निमूटपणे. 'विदूषक' नाटकात ते म्हणतात, त्याप्रमाणे 'दुःख खास आपल्या मालकीचे असते' म्हणून 'दुःख घडी घालून ठेवून द्यावं... काळजामध्ये' हे बोल त्यांनी आपल्या कवितेत सार्थ केले आहेत. त्यांनी वैयक्तिक दुःख हृदयाच्या कप्प्यात घडी घालून ठेवले आहे. त्यांच्या आत्मचरित्रपर लेखनातही ('वाटेवरच्या सावल्या') दुःखाचा हळवा सूर कधीच ऐकू येत नाही. पण हा आतील दुःखाचा वणवा शांत करण्यासाठी ते सतत निळ्या आकाशाकडे धाव घेतात आणि त्या अथांग तेजोमय निळाईत आपले दुःख विसर्जित करतात. असामान्य संयमाने ते आपले दुःख व्यक्त करतात. '*तिमिरात* चालता वाट...', 'होता धरा ही *पारखी,* जावे नभा, कोणीकडे', 'माझ्या डोळ्यांतली *ओल,* नभा, तूच पाहिलीस' अशा मोजक्या सूचक शब्दांत ते मनातील व्यथा व्यक्त करतात.

संयमशीलांना दुःखाची वेदना जाळीत नसते, असे थोडेच आहे? रवीन्द्रनाथांनी तर दुःखाला सुखाचे अंग मानले आहे, त्यांत विरोध मानिला नाही. अशाच स्थितप्रज्ञ वृत्तीने कवीने दुःखाकडे पाहिलेले दिसते. पण धीरोदात्त माणूस आपली अंतरीची व्यथा उघड करतो थोराकडेच! तसे कुसुमाग्रज आकाशाकडे दुःखाचे गाठोडे घेऊन जातात व त्याच्या नुसत्या सान्निध्यात ते शांत होतात. ते आकाशही त्यांना बोधखेदाची प्रवचने देत नाही, तर फक्त निळ्या हातांनी अलगद उचलून घेते, उरी लावते व चांदण्यात मिसळून देते. एवढेच घडते! पहा–

*नाही विचारले प्रश्न*
*नाही बोधखेद केला*
*फक्त चांदण्यात तुवा*
*दिले मिसळून मला*
*(हिमरेषा– पृ.१०२)*

कुसुमाग्रज रात्रीच्या नक्षत्रांकित आकाशाच्या बाहूंत जाऊन मुक्त मनाने असा दुःखभार हलका करतात.

कुसुमाग्रज आपल्या संयमशील वृत्तीमुळे दुःखाला गोंजारत बसले नाहीत; कारण त्यांनी आपले वैयक्तिक दुःख समाजदुःखात विलीन करून टाकले आहे. 'अवघ्या अभाग्यांचे अश्रू, उभे आमुच्या डोळ्यांत' अशी त्यांची स्थिती होती. 'मुक्तायना'तील 'खाजगी' ही कविता त्यांचे मनोगत अत्यंत उत्कटतेने व्यक्त करते. 'त्याच आकाशाने मला जन्म दिला. हे मी नाकारीत नाही. पण माझे हे आकाश अगदीच खाजगी. त्या विशाल आकाशात माझे हे छोटे आकाश विलीन होणार आहे, हे मला माहीत आहे,' पण शेवटी ते म्हणतात–

*पण तेव्हा देखील*
*आणि त्यानंतर कधीही*
*त्याला कळणार नाही*
*माझ्या या आकाशाने*
*काय भोगले*
*काय सोसले*
*काय अनुभवले!*

या कवितेत कवीचेही मौन व आकाशाचेही मौन. इथे दोन मौनांचा न बोलता संवाद झाला आहे. आकाशाने कवीचे मनोगत जाणले, तसे कवीनेही निःशब्दतेतून आकाशाकडून सांत्वन मिळविले.

कुसुमाग्रजांच्या समग्र कवितेत 'गती'ला विलक्षण महत्त्व आहे. किंबहुना 'गती' हा त्यांच्या काव्याचा अथवा जीवनाचा धर्म आहे.

*आता जाणार पुढे*
*रुद्ध न होणार गती (२०)*

असे त्यांनी 'जीवनलहरी'त आधीच म्हणून ठेवले आहे. तसे पाहिले, तर संबंध विश्व हेच अनेक सुनियमित गतींचे केंद्र आहे, असे म्हणता येईल. ते विविध अनंत गतींनी सुबद्ध झाले आहे. म्हणूनच ते व्यवस्थित चालले आहे. ग्रहगोलांची गती, तारकांची गती, ऋतुचक्राची

गती, वाऱ्याची गती, पावसाच्या धारांची गती अशा अनेक तालबद्ध गतींचे संवादी मीलन म्हणजे हे विश्व. गती हा तर अखिल विश्वाचा प्राण आहे. विश्वाची गतिमानता कधी सुंदर, कधी भीषण! हेच तर महेश्वराचे विराट तांडव!

या प्रकाशमान ग्रहताऱ्यांच्या विश्वात केवढी प्रचंड गती– सर्वांना आपल्याच कक्षेत भ्रमायला लावणारी. इतरांच्या गतीलाही नियंत्रित करणारी. 'हिमरेषे'तील 'उत्तर' ही कविता या दृष्टीने लक्षणीय आहे. कवीने आकाशातील सप्तर्षींना विचारले : 'तुमचा-आमचा प्रवास अंधाऱ्या आकाशातून अविरत चालला आहे. या प्रवासाचा हेतू तुम्हांस समजला आहे का?' या प्रश्नाचे उत्तर फक्त एकाच ऋषीने खिन्नतेने दिले :

*जन्म जाहला गतीत अमुचा*
*अंतहि आहे गतीत अमुचा*
*हेतुहीन या गतीत आहे*
*तुमचा अमुचा प्रपंच सारा*
*गुरफटलेला*

'हेतू' कळता, तर हा आमचा प्रवास समाप्त झाला असता, म्हणजे आमचे अंतराळातील भ्रमण थांबले असते. आमचे थांबणे म्हणजे आमचे जीवन संपणे. त्यामुळे समाप्त होण्याची कल्पना त्याला सहन होत नाही. म्हणून 'खिन्नपणाने' असा शब्द कवितेत साभिप्राय योजिला आहे. गतीतून आमच्या जीवनाचा जन्म झाला व त्याचा अंतही गतीतच आहे. इथे 'अंत' म्हणजे समाप्ती नव्हे, तर अंत म्हणजे सांगता, परिपूर्णता. गतीत राहण्यात आमच्या जीवनाची परिपूर्ती आहे, साफल्य आहे. कवी इतरत्र म्हणतो : 'या प्रवासातच आहे, प्रवासाची अंतिम सांगता.' या शब्दांतून वरील विवेचन अधिक स्पष्ट होईल. 'गतीतच जीवन असते' असा कवीचा जीवनविषयक सिद्धान्त आहे. 'आमचं सुख साधनेचं आहे, साध्यसंपादनाचं नाही,' असे 'समिधे'तील ऋषी उत्तरला होता (पृ. ३५). कवी स्वतःला 'पथिक', 'यात्रिक', 'पांथस्थ', 'प्रवासी' म्हणतो. त्याचा ईश्वर देखील 'स्वच्छंद प्रवासी' आहे, गतीत रमणारा.

या संदर्भात 'किनाऱ्या'तील 'एकाकी हा जागे' ही कविता लक्षणीय आहे.

*कर्मयोगी, आशा फलाची ना त्यास...*
*...अंतरीचे तेज उपासावे, द्यावे.*

दिव्याच्या प्रकाशदानात कवीला, 'निष्काम कर्मयोगी' दिसला. तसेच, त्याला ताऱ्यांच्या गतीतही 'कर्मयोगा'चा आदर्श दिसला. तारे अंधाराने अधिक पेटतात व रात्रभर आपल्यात दडलेले तेज उपसून आकाश (धरतीही) उजळतात. जळण्यातच त्यांच्या जीवनाची कृतार्थता आहे. जीवनासाठी गती आवश्यक आहे. हेतूशी काय करायचे? निष्काम बुद्धीने कर्मयोगाचे अविरत आचरण करणे, हेच जीवनाचे ध्येय (अर्थ) आहे, असे कवी आग्रहाने सांगतो :

*चालण्याचे श्रेय आहे*
*अन्य धर्माचार नाही*

आकाशातील ग्रहगोलांच्या गतीला तुम्ही दिशाहीन, अर्थहीन म्हणाल का? गतीनेच त्यांना गती (आधार) मिळते. 'गती' या कवितेत म्हटले आहे की, 'चालता चालता कवी स्वतःच वाट झाला', 'एक फक्त जाणवते, जाणे पुढे'. कवीला गतीचे वेड आहे. 'विशाखे'त बऱ्याच ठिकाणी प्रभावी गतिचित्रे कवीने डोळ्यांसमोर उभी केली आहेत. त्यांत नाट्य आहे. 'वादळला हा जीवनसागर' या पहिल्याच ओळीतील पहिलाच शब्द विलक्षण गती दाखवतो. 'कोलंबसा'चा गतिमान प्रवास, पृथ्वीची प्रेमासक्त गती, अहिन कुलांची संग्रामगती, वीरांची वेडात दौडलेली गती, अशी कितीतरी गतिपूर्ण चित्रे नजरेस खिळवून ठेवितात. त्यांचा 'संत'ही रवीन्द्रनाथांच्या 'एकला चलो' या गीतातील 'महायात्रिका'प्रमाणे आहे.

*तू तुझ्या मार्गाने जा*
*मागे वळून पाहू नकोस*

असे कवी त्याला आवर्जून सांगतो. अंतराळातील तारकांची गती अशाच प्रकारची आहे.

या संग्रहात सूर्यचंद्रांच्या मानाने आकाश-तारकांचे संदर्भ असलेल्या कविताच अधिक आहेत, असे दिसून येईल. सूर्यचंद्रांपेक्षा नक्षत्रांकित आकाश हे कवीच्या मनास अधिक भारावून टाकणारे व अधिक अन्तर्मुख करणारे. अथर्ववेदातील ऋषी रात्रीच्या आकाशाखाली स्तिमितमुग्ध होऊन उद्‌गारतो :

*देवस्य पश्य काव्यं, न ममार न जीर्यति।। १०-८-३२*

– हे देवाचे काव्य (प्रज्ञान) पाहा, जे मरत नाही, जीर्ण होत नाही.' असेच तारकांच्या प्रेमात पडून दाहक वास्तवात रमणाऱ्या कुसुमाग्रजांनी आकाशाशी करार केला आणि त्यातील एक तारका मालकीची करून टाकली. तिच्यावर त्यांनी निवास केला. 'व्यवहारापुरता कवी येथे वावरत असला, तरी,' पृथ्वीवर जेव्हा द्वेषाचे ज्वालामुखी जागे होतात आणि अमानुषता कोकिळेचे गाणे जेव्हा बर्फाच्या प्रपातात गोठवून टाकते, तेव्हा कवीचे खिन्न मन त्या तारकेवरच विसावते. 'मराठी माती'मधील दूरस्थ तारकेशी साधलेला संवाद असेच मन वेधून घेणारा आहे : 'हे आकाशकन्ये, आपल्यामध्ये अमित प्रकाशवर्षांचे अंतर आहे. तुझे-माझे वेगळे विश्व अन् वेगळे धर्म. तुझ्या रूपात अपार अग्नी, मी मात्र मातीचा कण' हे सर्व काही ठाऊक असूनही आज–

*कल्पनाकोषात ज्ञान हो कैद*
*आणिक एकाच घटकेसाठी*
*अंतर तुटून भिन्नता लोपून*

*निशेच्या अंधाऱ्या मांडवामध्ये*
*आपण एक*

असा अद्वैताचा साक्षात्कार कवीला होतो.

तारे अंधारात चमचमतात. कशासाठी? त्यांना माणसाला काही सांगायचे आहे. या असीम काळोखी विश्वात–

*उमललं आहे*
*सुंदर फूल*
*– आणि एकच*
*प्रेमाचं*

हे नक्षत्रफूल अवघ्या विश्वाचा आधार आहे. या नक्षत्रफुलाचा मानवाला एकच संदेश आहे : 'फक्त प्रेम करणं, जगणं म्हणजे प्रेम करणं.' या जगात प्रेमाचे अस्तित्व नसते, तर सूर्याची प्रकाशयात्रा निरर्थक ठरली असती. विराट कालप्रवाह वाहत राहिला असता किनाऱ्याशिवाय; आणि देवही नुसता भ्रमत राहिला असता निरर्थ! ईश्वरही माणसाच्या प्रज्ञेने निर्माण केला आहे. तो साकार केला भक्तीने. तुकोबा म्हणतात ना–

*आमुचिया भावे तुज देवपण*

अशा घडविलेल्या देवाला भक्ताच्या प्रेमाचे कवच लाभले. प्रेमाचेच हे वरदान होय, असे हे 'फूल' सुचविते.

दूरतम अंतराळातील या ब्रह्मज्योती 'केव्हा उगवतील, केव्हा मावळतील'. पण कवीने आपल्या हृदयातील खाजगी आकाश जपून ठेवायला सांगितले आहे. कबीराच्या सुंदर गीताची इथं आठवण होते :

*इस घट अंतर सात समुंदर,*
*इसीमें नौ लख तारा*

–'या देहाच्या आत सात समुद्र उचंबळत आहेत आणि यात नऊ लक्ष तारा झळकत आहेत.' दृष्टी असलेल्या माणसालाच हे निरंतर उसळते आणि झळकते दृश्य दिसेल. अंतरात गाढ निष्ठेच्या, श्रद्धांच्या आणि सद्भावनांच्या तारका प्रकाशत राहिल्याच पाहिजेत. याच जर विझून गेल्या, तर हजारो सूर्यही तुमच्या मार्गावर अवसेचा अंधारच ओतीत राहतील. खरा प्रकाश माणसाच्या अंतरातच असतो, हे परम सत्य 'सवाल हा आहे' या कवितेतून उत्कटतेने मांडले आहे :

*त्या जर विझल्या असतील*
*तर त्या दूरस्थ तारकाच काय,*
*पण सहस्त्र सूर्यही*
*तुमच्या मार्गावर*
*अमावास्याच ओतीत राहतील. (पा॰ पृ.१७)*

सूर्य अस्ताला गेला, तरी त्याचे दुःख कवीला नाही; कारण अंधार पडताच तारका उगवणार आहेत. दिवसा सूर्य आणि रात्री नक्षत्रपुंज अशी व्यवस्था करून विधात्याने सृष्टीतील प्रकाशचक्र सतत भ्रमत ठेवले आहे, माणसासाठी. रवीन्द्रनाथांचे एक सुंदर वचन आहे :

*If you shed tears when you miss the sun,*
*you also miss the stars.*

'सूर्यास्ताबद्दल तुम्ही अश्रू ढाळत बसलात, तर त्या अश्रुपटलाने रात्री आकाशात चमकणाऱ्या चांदण्या तुम्हांस दिसणार नाहीत.'

'सूर्यास्तानंतर' तमावर तारकांची संपदा प्रकट होते, ती उगाच नाही. त्या अमर ज्योती केवळ रात्रीचा अंधार दूर घालवीत नाहीत, तर या नभाने व या अंधाराने उद्याच्या प्रकाशासाठी जणू सोनेरी अक्षरांत तमःपटलावर हे करारपत्रच कोरले आहे, असे आश्वासन कवी देतो. कुसुमाग्रजांचा दुर्दम्य आशावाद व उदंड जिजीविषा या तेजस्वी शब्दांतून व्यक्त होत आहेत.

कुसुमाग्रज आस्तिक आहेत, की, नास्तिक हा प्रश्न बहुचर्चित आहे. 'जीवनलहरी'त ते म्हणतात : 'दीपकळी एक जळे, माझ्याही हृदयतमी', 'रात्रीच्या तिमिरातुन, घेतो मी प्रभुदर्शन'. विराट नभाच्या निळ्या घुमटाला त्यांनी 'देवाचे देऊळ' म्हटले आहे. यावरून त्यांचा देव हा दगडाच्या मूर्तीत नाही व अंधश्रद्धांच्या शृंखलांत कैद झालेला नाही. यानंतर 'विशाखे'त तर त्यांनी देवाविरुद्ध बंडच पुकारले आहे! 'विशाखे'ने मराठी कवितेत अन्तर्बाह्य क्रांती घडवून आणली आहे. हे सर्वमान्य आहे. 'देवाचिये दारी' या कवितेत–

*आहेस की नाही, आज नसे चिंता।*
*दोहोंमध्ये आता, भेद नुरे।।*

असे ते निःसंदिग्धपणे म्हणतात. 'तुझ्या दाराशी मी दयायाचना करणार नाही. जीवनसंग्रामात मला एकट्यानेच मनगटाच्या बळावर लढले पाहिजे', असे त्यांनी इहवादी दृष्टीने निश्चयपूर्वक प्रतिपादिले आहे. पण 'असिसि कुठे तू?' असा प्रश्न कवीच्या मनात रेंगाळतोच.

'किनाऱ्या'त कवीच्या या वृत्तीत परिवर्तन झालेले दिसते. 'तारका म्हणजे अविरत

फिरणाऱ्या प्रवासी ईश्वराची तमावर उठलेली पाउलचिन्हेच आहेत.' या शब्दांतून त्यांनी ईश्वराच्या अस्तित्वाविषयी गाढ श्रद्धा व्यक्त केली आहे. 'माझ्या हृदयात त्याचे सिंहासन आहे' असे ते पुढे म्हणतात. 'मराठी माती'त ही श्रद्धा अधिक बळावलेली दिसते. 'तू नाहीस' असे गर्जत कवीने वितंड केले. पण–

*गगनात दाटता पण रजनीच्या छाया*
*'आहेस' म्हणे मन माझे, तू आहेस.*

कवीची अगतिकता पाहून नभातील चांदण्या हसू लागल्या. याच संग्रहातील एका जीवनलहरीत सृष्टीलाच कवीच्या नास्तिकतेबद्दल कीव आणि रागही आला :

*तो नाही मी म्हणता*
*डोंगरतट कुजबुजती*
*आर्द्र दयाशील नेत्र*
*खिळवी नभ मजवरती*
*थरथरते गवत तळी*
*लवते शरमून कळी*
*लक्ष हस्त उचलुनिया*
*गर्जतसे रत्नाकर*

आकाशातील तेजोमय विश्व हा परमात्म्याचाच आविष्कार आहे, असे ते मानू लागलेले आहेत. पण ईश्वर हा अनाकलनीय आहे, असे त्यांना वाटते.

तथापि, तारकांच्या अंधूक मोहक विलासात परमेश्वर कवीच्या हृदयात अलगद उतरतो. तारकादर्शन हे निरीश्वरवाद्यालाही ईश्वरवादी बनवील, असे त्यांना ठामपणे वाटते. नक्षत्रांच्या गहनगूढ लुकलुकण्यातून कवीच्या मनात ईश्वरविषयक गाढ श्रद्धा पाझरत आहे, असे म्हणावेसे वाटते. 'विशाखे'तील संशयवाद इथे पूर्ण मावळला आहे. अज्ञेयवादही कविमनातून लुप्त झाला आहे. आता या नक्षत्रवितानातून कवीला त्या प्रकाशाच्या प्रकाशकाचा साक्षात्कार झाला आहे. उत्तररात्री 'चांदण्यांनी खचलेले, अपार धूसराने ओथंबलेले आकाश' हे ईश्वराच्या अस्तित्वाचे साक्षीदार आहे, अशी स्पष्ट ग्वाही तो देतो. 'नजर' या कवितेत 'स्वयंभू जाणीवहीन अस्तित्वा'ला ईश्वरी श्रद्धेचे अंकुर फुटले आहेत.

या संग्रहात समाविष्ट केलेल्या बऱ्याच कविता कुसुमाग्रजांच्या काव्यजीवनाच्या उत्तरकालखंडातील आहेत. त्यात परिणतप्रज्ञ कवीची वैचारिक प्रगल्भता व गंभीरता रसिकास पदोपदी जाणवेल. चैत्र-वैशाखांत द्राक्षांचे घड पक्व होऊन फिकट लालसर दिसू लागावेत,

अशीही अवस्था आहे. प्रत्येक द्राक्ष हे मधुरतेने ओतप्रोत ओथंबले आहे. इथे कबीराचे एक हृद्य गीत मनात येते :

*तिंविर साँझका गहिरा आवै, छावै प्रेम मनतनमें*
*पच्छिम दिसकी खिड़की खोलो, डूबहु प्रेमगगनमें।।*

—'संध्याकाळचा अंधार दाटत चालला आहे. मनात व देहात प्रेम (भक्ती) उसळत आहे. पश्चिमेची खिडकी उघडून द्या आणि प्रेमाच्या आकाशात मला डुंबू द्या.'

कुसुमाग्रजांच्या संध्येतही असेच प्रेममांगल्य दाटून आले आहे. प्रेमाने ओथंबलेले आकाश त्यांना बोलवीत आहे, तारका नेत्र मिचकावून खुणावत आहेत आणि कुसुमाग्रजही त्या विशाल निळ्या घुमटातील अमर ज्योतींना स्नेहभराने न्याहाळीत आहेत.

सूर्य मावळतीला गेला, याचा कवीला मुळीच खेद नाही. अथांग आकाशातील अनंत तारकाविश्व त्याच्या साथीला प्रथमपासून आहे आणि रात्र झाली, म्हणून काय झाले? 'उजेडाचा उगम सूर्यामध्ये नसतो, अंजू, माणसाच्या मनामध्येच असतो तो' (विदूषक– पृ. २१), असे निश्चयाने सांगणारा हा श्रेष्ठ कवी. अवघ्या जीवनभर सूर्य-चंद्र-तारकांचे तेज शब्दाशब्दांतून मुक्तहस्ते उधळणारा आणि काळ्या मातीत तारकांचे तेज पेरणारा, पक्ष्यांच्या पंखांत आणि झऱ्यांच्या गीतांत आकाश पेरणारा, जमिनीत नक्षत्रांची रोपे लावणारा असा हा क्रांतदर्शी युगकवी! आपल्या तेजोदानाने मराठी मातीला सदैव ऋणी करून ठेवणारा हा प्रकाशपूजक कवी आता संध्या पाहताना कृतज्ञतेने उद्‌गारतो :

*उषा सुंदर होतीच*
*पण अधिक सुंदर आहे*
*ही संध्या*

कारण त्यांच्या प्रतिभेचा सूर्य जीवनभराच्या प्रकाशदानाने कृतार्थ झाला आहे. आता ही सांज तृप्ततेची आहे. हे तृप्तीच्या अमृताचे पात्र ओसंडून वाहत आहे–

*आणि मी*
*माझे अस्तित्व*
*आता अंधारात विश्रान्त होताना*
*सर्वंकष आशयाने*
*शिगोशिग भरलेले.*
*असण्याचे उन्नयन*
*जगण्यात करणारी*
*ही संध्या*

अशा कृतार्थतेने दिवसाला अभिवादन करणारी ही सायंकाळ आहे. निरंतर उद्याच्या सूर्योदयाकडे उदंड आशावादाने व अपूर्व उत्सुकतेने कुसुमाग्रज पाहत आले आहेत. म्हणून ते म्हणतात :

*उगवणारा आजचा सूर्य*
*कालचा सूर्य मारतो आहे*
*उद्या उगवणारा सूर्य*
*आज मला तारतो आहे*

भूतकालाकडे ते पाहत नाहीत, उद्याच्या मानवाच्या उज्ज्वल भविष्यकालाकडे त्यांचे लक्ष लागून राहिले आहे. त्यासाठी ते वार्धक्यातही निराश न होता वचन देतात :

*रित्या पात्रात चैतन्याच्या*
*ठिणग्या तोवर भरणे आहे*

हे प्रकाशाचे स्फुलिंग हा कविश्रेष्ठ जीवनभर उधळीत आला आहे. ऐरणीवरचे घाव सोसून ठिणग्या उडवणाऱ्या तप्त लोहगोलकाप्रमाणे. तेच त्याच्या कवितेचे अवतारकार्य आहे.

येथवर प्रवास रमणीय होता. असे आनंदभरित अन्तःकरणाने तो गातो आहे–

*तो प्रवास सुंदर होता*
*आधार गतीला धरती*
*तेजोमय नक्षत्रांचे*
*आश्वासन माथ्यावरती*

कवी धरतीवरच्या मातीत घट्ट पाय रोवून वाटचाल करीत आहे. त्याचा प्रवास अविश्रांतपणे चालणार आहे, कारण तेजस्वी नक्षत्रांची सभा त्याच्या मस्तकावर आश्वासक हात ठेवीत आहे. आसमंतात चांदणे रिमझिमत आहे– वणवा विझवण्यासाठी.

मराठी मातीच्या सौभाग्याने हा कविश्रेष्ठ उषेप्रमाणे चिरयौवनाचे वरदान घेऊन आला आहे. भारतीय संस्कृतीच्या प्रकाशधारा त्याच्या अलौकिक प्रतिभेच्या कारंजातून कल्पकतेच्या इंद्रधनूंचा थवा घेऊन आकाशात उंच उडत आहेत. अजूनही त्याला जीवनाचे जबरदस्त आकर्षण आहे. त्याच्याच संजीवक शब्दांत सांगायचे, तर मैफल संपली आहे, तरी वीणेच्या तारांतून गीत झंकारत आहे चंद्र मावळला तरी, रात्र स्वप्नधुंद आहे–

*चंद्र कलंडला, तरी*
*रात्र वेल्हाळत आहे*
*फांद्यांतून जळावर*
*स्वप्न निथळत आहे*

कुसुमाग्रजांची प्रस्तुत कविता आकाशातील चिरंतन ज्योतींची उज्ज्वल गाथा आहे. एकाच विराट तेजाचे हे भिन्न भिन्न आविष्कार. यांतील सूर्य हा त्यांच्या काव्याकाशात मध्यवर्ती आहे. सूर्यकल्पनेने त्यांचे मन झपाटलेले आहे. हा सूर्य त्यांच्या काव्यात अत्यंत आशयघन प्रतीक बनला आहे. त्याचे उदयास्त हे त्यांच्या शब्दविश्वात केवळ निसर्गघटना राहिले नाहीत, तर मानवाच्या उत्थान–पतनाचे, आशानिराशांचे द्योतक बनले आहेत. कुसुमाग्रजांचा सारा भर 'दीप्तीवर आहे, उधाणावर' आहे. सूर्याचे अरुणमंगल प्रखर तेज, चंद्राचे शीतल पारिजातकी चांदणे, तारकांची मंद आश्वासक प्रभा, मौनातून बोलणाऱ्या आकाशाची शांतिप्रद गहननीलता व नितळ निर्लेपता यांचे एकत्रित दर्शन रसिकाला त्यांच्या काव्यातून घडते. सामाजिक परिवर्तनासाठी त्यांनी आपल्या शब्दांतून क्रांतीच्या मशाली पेटविल्या; पण माणूस घडविण्यासाठी त्यांनी मनामनांतून सूर्यतारकांच्या तेजाची पेरणी केली, आकाशही पेरले. त्यांनी अथांग आकाशविश्व वैज्ञानिक दृष्टीने पाहिलेच; पण त्याहून अधिक तत्त्वज्ञाच्या तलस्पर्शी दृष्टीने ते न्याहाळले. या कवितेतून आकाशतारका पाहण्याची दिव्य नजर व्यक्त केली व मानवी अस्तित्वाचे समुन्नयन केले. इथे नुसते 'तारकांचे गाणे' आढळणार नाही, तर परमतेजाचे तत्त्वदर्शन घडेल. हाच त्यांच्या काव्यातील 'परतत्त्वस्पर्श' होय.

*'काळजामध्ये जपा*
*उजेडाचा वसा'*

असा या कवितेचा सांगावा आहे. हाच प्रकाशाचा ध्यास त्याच्या शब्दांना प्रथमपासून लागला होता, म्हणून ते कळकळीने प्रार्थना करतात:

*'अनन्त अवकाशात जन्मलेल्या या दैवतासाठी*
*भक्तिभावाने आपल्या अन्तःकरणाची मंदिरे करू.*

*जेथे तो जागत असेल, तेथे त्याला जागता ठेवू.*
*जेथे तो मालवला असेल, तेथे त्याला जाग आणू.*

*आपण अग्निमय होऊ.'*

*(समिधा– पृ. ५)*

'समिधा',
इंदिरानगर, नासिक – ९

**– वसन्त सं. पाटील**

## उषासूक्त

तांबूस स्तनांचा
प्रफुल्ल उद्रेक
विश्वास दावीत ये।

सोनेरी मांड्यांची
मिरास पृथ्वीच्या
मातीत रोवीत ये।।

तमात लोपल्या
रंगीत रेषांचे
प्रासाद बांधीत ये।

मृत्यूची राणीव
जिण्याची जाणीव
पुनश्च सांधीत ये।।

पक्ष्यांच्या पंखांत
झऱ्यांच्या गीतांत
आकाश पेरीत ये।

मानवी संज्ञेच्या
कड्यात कलेचे
कैलास कोरीत ये।।

अंधाऱ्या गुहांत
डोहांत, सूर्याचा
सांगावा शिंपीत ये।

सावळ्या घनांच्या
तळ्यांत तेजाची
कमळे लावीत ये।।

अरूप विश्वात
आकारबंधांची
        आरास मांडीत ये।

सूर्याच्या समोर
अशेष आपुले
        अस्तित्व सांडीत ये।।

## नभा तूच

साता जन्माची वैरीण
पृथ्वी झाली होती सारी
माझा व्याकुल वणवा
न्यावा कोणाच्या मी दारी.

माझ्या डोळ्यांतील ओल
नभा तूच पाहिलीस
निळ्या हातांनी ओढून
मला उरी घेतलेस.

नाही विचारले प्रश्न
नाही बोधखेद केला
फक्त चांदण्यात तुवा
दिले मिसळून मला.

## स्तोत्र

प्रकाशदाता
जीवनदाता
हे सविता, उदयाचलि ये

विश्वकमल हे
मुग्ध अचेतन
दलादलातुनि फुलवित ये

निराकारल्या
चराचरांतुन
सुवर्णरेषा सांधित ये

नीरवतेच्या
मरुभूमीवर
सौध स्वरांचे बांधित ये

अवकाशातिल
भ्रांत घनांवर
जीवन आशय शिंपित ये

पृथ्वीवरच्या
रित्या मनांतुन
प्रकाशपद तव रोवित ये

# नाते

नात्यास नाव अपुल्या देऊ नकोस काही।
साऱ्याच चांदण्यांची जगतास जाण नाही।।

व्यवहारकोविदांचा होईल रोष, होवो।
व्याख्येतुनीच त्यांची प्रज्ञा वहात जाई।।

ना तालराग यांच्या बंधात बांधलेला।
स्वरमेघ मंजुळाचा बरसे दिशांत दाही।।

गावातल्या दिव्यांना पथ तो कसा पुसावा।
मंझीलकी जयाची तारांगणात राही।।

## पाउलचिन्हे

मी एक रात्रि त्या नक्षत्रांना पुसले
परमेश्वर नाही घोकत मन मम बसलें
परि तुम्ही चिरंतन विश्वातील प्रवासी
का चरण केधवा तुम्हांस त्याचे दिसले?

स्मित करुन म्हणाल्या मला चांदण्या काही,
तो मुक्त प्रवासी फिरत सदोदित राही
उठतात तमावर त्याची पाउलचिन्हे–
त्यांनाच पुससि तू, आहे, की तो नाही!

ाहेस
गहेस
रंवार सांगू नका,
ड़ांला नाही,
भाकाशाला मात्र
वेळा सांगितलं असेल
आहे.

च्या सुंदरबनात
ल्हा फसतो
मेच्या किरमिजी मांसलात
लेले आकाश
ते
स्वरात
शपणाही असाच असतो.

# तोच जाणे

त्वष्ट्याने
कातून काढला सूर्य
संज्ञेच्या सांत्वनासाठी
आपल्या सुतारी चक्रावर,
तसाच काततो आहे मला
सूर्य
काळाच्या करवती चाकावर
आणि भिरकावून देतो
माझे अगणित चिरफळे
सहस्र स्थळांवर,
कोट्यवधी क्षणांवर
क्षणापळांनी कातलेला मी
अनेक स्थळांनी गिळलेला मी
असंख्य घटनांनी तोडलेला मी
किती शिल्लक राहिलो आहे.
सूर्यच जाणे!

सूर्यास्ताचे
हे चार किरण
मी खुडून आणले आहेत,
आजच्या असह्य
भयाण
तुफानलेल्या रात्रीसाठी.
ते देणार नाहीत प्रकाश
पेटवणार नाहीत दिवे,
ते फक्त
जागृत ठेवतील
उद्याचा
सूर्योदय
तुझ्या आणि माझ्या
मनांतला.

# आदिवासी

रानटी मी आदिवासी
या पथी संचारतो।
रूपशाली वाहनांचा
ओघ ज्यावर वाहतो।।

जंगली मातीतृणांच्या
शिंपता मार्गी खुणा।
संस्कृतीच्या पापण्यांतुन
क्रुद्धता काढी फणा।।

मी दुकानी जातसे
थैलीत घेउनि तारका।
त्या पुढारुन सांगतो, मज
एक घरटे द्याल का?।।

हासती, रागावती,
धिक्कारुनी ते बोलती।
चांदण्यांची, बर्बरा,
येथे न नाणी चालती।।

# उत्तर

गगनामधल्या सात ऋषींना
एक पहाटे विचारले मी,
तुमचा माझा प्रवास चाले
तिमिराने भरलेल्या व्योमी
या मातीचे
मजला बंधन
तुम्ही नभातिल
मुनी सनातन
या फिरण्याचा हेतु तुम्हांला
काय गवसला?

एक ऋषी मुख वळवुनि मागे
खिन्न स्वराने मला म्हणाला,
हेतू कळता, प्रवास तर हा
कधीच असता समाप्त झाला–
जन्म जाहला
गतीत अमुचा
अंतहि आहे
गतीत अमुचा
हेतुहीन या गतीत आहे
तुमचा अमुचा प्रपंच सारा
गुरफटलेला

## उषा-स्तवन

लक्ष वेळ वधलीस रात्र तूं
या देवी उदयाद्रिवरी
लक्ष वेळ तव रथचक्रांची
धूळ उधळली दिगंतरी.

लक्ष वेळ या कनकशिळेवर
क्षालन हो तव चरणांचे
मेघमडलांतून पेटले
दीप हिरण्मय किरणांचे.

दिग्गज दश हे उचलुनि शुंडा
अर्चन कोटि तुझे करिती
स्पर्श तुझा शिवमंगल व्हाया
पायतळी पडली धरती.

अजर अमर हे गगनकन्यके
अग्नीचे तनुधारण तू
तू शक्तीचे परम शिवालय
रूपरसाचे कारण तू.

तूच उर्वशी पुरुपाशांतुनि
स्वर्गि जावया सजलेली
विगलितवसना मुक्तकुंतला
मेघदवाने भिजलेली.

तूच उमा रणरंजित रुद्रा
भैरव तांडव करणारी
अग्निशूल परजीत लक्ष करि
दैत्यांचे दळ चिरणारी.

सांबजटेतुनि वत्सल गंगा
तू अवतरसी भूवरती
तू सृजनात्मक जाण विधीची
तू विष्णूची प्रेमरती.

तू पहिला उन्मेष द्युतीचा
अनंततेच्या मनी स्फुरे
जीवनधात्री प्रथम कणव तू
जी ईशाच्या हृदयि भरे.

काळाचे बलिवर्द कोटि ते
अंध पिसाट, तमी पळती
सुवर्णवलये फेकुनि, त्यांची
नियमित केलिस तूच गती.

भयाण पहिल्या गहन अभावी
गर्भ जिण्याचे गुदमरले
गगनतटावर उभे राहुनी
माझे माझे तू म्हटले.

प्रसादवच ते दिशांत घुमता
परार्ध शून्ये तटतटली
रसरेषांची अगणित नगरे
त्या कवचामधुनी उठली.

विश्वामधले सात रंग हे
जागृत झाले तुझ्यामुळे
तुझ्यामुळे हो जमीन वसुधा
तीर्थरूप ही होत जळे.

उरि धरिसी तू पर्वत कलिका
मातीचा कण सागरही
तुझ्या दयेच्या अरुणमंदिरी
विषम ऋणाचा सल नाही.

हे महदार्ये, हे करुणेश्वरि
हे प्रिय ज़ननी इंद्रप्रिये
अमित मनांच्या मखमालीवर
चरण सदाशिव टाकित ये.

दीप्तीचे ध्वज केशर कांचन
विश्वतटावर रोवित ये
कोटि कोटि या मुकुलदलांवर
जीवन अमृत शिंपित ये.

ज्वालामय रथचक्राखाली
दुर्ग तमाचे फोडित ये
लक्ष युगांचे सुवर्णबंधन
कमलकराने जोडित ये.

## हा चंद्र

त्या चंद्राचे या चंद्राचे
मुळीच नाही काही नाते.
त्या चंद्रावर–
अंतरिक्षयानात बसोनी
माकड मानव कुत्रा यांना
जाता येते;
या चंद्राला वाटच नाही
एक नेमके ठिकाण नाही
हाहि नभाचा मानकरी पण–
लक्ष मनांच्या इंद्रगुहांतुनि
भटकत राही.

नटखट मोठा
ढोंगीसोंगी
लिंबोणीच्या झाडामागे
केव्हा लपतो मुलाप्रमाणे
पीन स्तनांच्या दरेत केव्हा
चुरून जातो फुलाप्रमाणे
भग्न मंदिरावरी केधवा
बृहस्पतीसम करतो चिंतन
कधी बावळा तळ्यांत बुडतो
थरथर कापत बघतो आतुन,
तटघुमटावर
केव्हा चढतो,
कधी विदूषक पाणवठ्यावर
घसरुनि पडतो,
कुठे घराच्या कौलारांतुनि
उतरुनि खाली शेजेवरती
तिथे कुणाची कमलपापणी
हळूच उघडुन

नयनी शिरतो,
कधी कुणाच्या मुक्त मनस्वी प्रतिभेसाठी
द्वारपाल होऊन जगाच्या
रहस्यतेचे दार उघडतो.

अशा बिलंदर अनंतफंदी
या चंद्राचे
त्या चंद्राशी कुठले नाते?
त्या चंद्रावर
विज्ञानाची शिडी लावुनी
शास्त्रज्ञांना चढता येते
रसिक मनांना या चंद्राला
पळभर केव्हा
जळात वा डोळ्यांतच केवळ
धरता येते.

' करार एका ताऱ्याशी

# कोकिळगाणे

आंब्यावरचे कोकिळगाणे
पहाटशेजेवर अवतरले
बर्फावरती वसंत पेरित
मनात फिरले
देहामधल्या तिठ्यातिठ्यावर
चंद्रदिव्यांचे पेटवुनी सर
पंखांवर अरुणोदय झेलित
पुनश्च फांदीवर आंब्याच्या
जाउनि बसले.

# तोवर

उगवणारा आजचा सूर्य
कालचा सूर्य मारतो आहे
उद्या उगवणारा सूर्य
आज मला तारतो आहे

आज काल उद्याचे मी
नसते नाते विणतो आहे
आकाशावर आशयमहाल
बांधण्यासाठी शिणतो आहे

निसर्गातून असणे आले
निसर्गातच सरणे आहे
रित्या पात्रात चैतन्याच्या
ठिणग्या तोवर भरणे आहे

# दुपारी

हा पक्षी तर–
बसला होता माझ्याजवळी
        आज सकाळी
उषःकालच्या आकाशाचा
पडला होता माझ्यासाठी
        तुकडा खाली
अज्ञाताने मला दिलेल्या
        दानामधले
एक नवल हे उरले होते
माझ्या द्वारी
त्या पक्ष्याच्या
तीर खोचुनी उरात गेला
        कोण शिकारी
        आज दुपारी?

# संवाद

उत्तर रात्री मी
येऊन जाग
सहज बाहेर
पाहिले जरा–

भुरक्या ढगाच्या
उशीत मऊ
घालून मस्तक
पहुडे धरा.

काजळी दुलई
सारून थोडी
जागृत होऊन
देखता नभा–

मंचकाजवळ
शुक्राचा तारा
दिसला एकटा
राहिला उभा.

पुसे ती लाजून,
'अजून का, रे–
गेलेला निघून
ताऱ्यांचा थवा–

'एकटा राहसी
उगाच येथे
उशाशी घेऊन
हातात दिवा?"

म्हणाला हासून,
‘प्रीतीची तुझ्या
अपेक्षा अंतरी
मुळीच नाही–

‘माहित मजला
हृदय तुझे
कोणाच्या नेत्रांत
गुंतून राही!

‘परंतु जेधवा
क्षितिजावरी
येईल उषेच्या
रथात रवि–

‘न्हाऊन गर्दीने
सोडून निळी
नेसून वसने
सोनेरी नवी–

‘जाशील थाटात
लाजत पुढे
कराया स्वागत
आकाशद्वारी–

‘तुझी ती प्रसन्न
लावण्यप्रभा
पाहून माघारी
जाईन घरी!’

# मी

सृष्टीतील सृजनशक्तीचा
मी आहे एक
खास उन्मेष,
जो पूर्वी कधी घडला नव्हता
सृष्टीच्या प्रारंभापर्यंत
आणि पुन्हा कधीही घडणार नाही
सृष्टीच्या अंतापर्यंत
असा एक खास मी!
माझं एक खाजगी आकाश असतं, माताजी,
ज्यात उगवतात चंद्र, सूर्य, तारे
तेही माझेच खाजगी, माताजी,
माझी एक खाजगी पृथ्वी असते
जिच्यावर वावरत असतं
माझं अस्तित्व
एकटं माताजी, अगदी एकटं;
तुम्हां लोकांना मी दिसतो ना, माताजी
तो मी नसतोच–
आणि तसाही नसतोच, माताजी,
तुम्हांला दिसतात, त्या फक्त असतात
माझ्या रूपाचा अनुवाद करणाऱ्या
रंगीत चिंध्यांच्या बाहुल्या,
ज्या बनवलेल्या असतात तुम्हीच, माताजी,
स्वतःच्या समजुतीनं
आणि स्वतःच्या सोयीसाठी.
तात्पर्य, माताजी,
माणूस आपल्यापर्यंत पोचतो,
तो एका संबंधामधून,
पण त्या संबंधाच्या तुकड्याहून
तो केवढा तरी अफाट प्रचंड असतो.

खिडकीच्या काचेतून
उन्हाचा कवडसा आपल्या खोलीत पडतो, माताजी,
पण कवडसाच, माताजी,
सूर्य नव्हे.
हजारो कवडसे पडले, तरी
आकाशातील ती ज्वलंत घटना
अनोळखीच राहते
आपल्या जाणिवांना !

# कृष्णविवर

अंतराळातील
 कृष्णविवर
काळोखाचे सनातन ब्रह्मांड
प्रकाशाची हत्या करणारे
आकाशगंगेतील
नक्षत्रांनी नाकारलेल्या
अंधाराला
 आधार देणारे
आकाशधर्म झुगारून
बेबंद भ्रमणाऱ्या
ग्रहगोलांना
मायावी बाहुपाशात
खेचून घेणारे
सूर्यकन्या पृथ्वी
पित्याशी द्रोह करून
मुक्तीच्या अहंभावी
लालसेने
त्या विवराकडे
सरकत आहे?

युगामागुनी चालली, रे, युगे ही
करावी किती, भास्करा, वंचना
किती काळ कक्षेत धावू तुझ्या मी
कितीदा करू प्रीतिची याचना

नव्हाळीतले ना उमाळे, उसासे
न ती आग अंगात आता उरे
विझूनी अता यौवनाच्या मशाली
उरी राहिले काजळी कोपरे!

परी अंतरी प्रीतिची ज्योत जागे
अविश्रान्त राहील अन् जागती
न जाणे, न नेणे, कुठे चालले मी
कळे तू पुढे आणि मी मागुती!

दिमाखात तारे नटोनी थटोनी
शिरी टाकिती दिव्य उल्का-फुले
परंतू तुझ्या मूर्तिवाचून, देवा,
मला वाटते विश्व अंधारले!

तुवा सांडलेले कुठे अंतराळात
वेचूनिया दिव्य तेजःकण
मला मोहवाया बघे हा सुधांशू
तपाचार स्वीकारुनी दारुण.

पिसारा प्रभेचा उभारून दारी
पहाटे उभा शुक्र हा प्रेमळ
करी याचना प्रीतिची लाजुनी लाल—
होऊनिया लाजरा मंगळ.

निराशेत संन्यस्त होऊन बैसे
ऋषींच्या कुळी उत्तरेला ध्रुव
पिसाटापरी केस पिंजारुनी हा
करी धूमकेतू कधी आर्जव!

परी भव्य ते तेज पाहून पूजून
घेऊ गळ्याशी कसे काजवे
नको क्षुद्र शृंगार तो दुर्बळांचा
तुझी दूरता त्याहुनी साहवे!

तळी जागणारा निखारा उफाळून
येतो कधी आठवाने वर
शहारून येते कधी अंग, तूझ्या–
स्मृतीने उले अन् सले अन्तर!

गमे की तुझ्या रुद्र रूपात जावे
मिळोनी गळा घालुनीया गळा
तुझ्या लाल ओठांतली आग प्यावी
मिठीने तुझ्या तीव्र व्हाव्या कळा!

अमर्याद, मित्रा, तुझी थोरवी अन्
मला ज्ञात मी एक धूलीकण
अलंकारण्याला परी पाय तूझे
धुळीचेच आहे मला भूषण!

# अर्थ

साक्षात सूर्यही
विस्मित झाला
पृथ्वीच्या मातीतील
स्वयंसिद्ध प्रकाशाच्या
        वसाहती पाहून.
सूर्यमंडळातील
सारे ग्रहही उद्‍गारले :
आमच्या अर्थहीन यात्रेत
ही एकच
जिच्यावर लखलखत आहेत
सनातन अर्थाच्या
        लक्षावधी दीपमाळा.
–आणि आज
आमच्याच हातांतील
करंट्या कुऱ्हाडी
परजलेल्या आहेत–आम्हीच
त्या दीपमाळा
तो युगार्जित अर्थ
        संहारण्यासाठी.

## तोपर्यंत...!

आकाश
मेघांनी मारून टाकलेलं,
आकाश नाही
म्हणून तारकाही नाहीत,
सूर्य केव्हाच मावळलेला
चंद्र तर येणारच नव्हता,
धरणीवरचे सारे प्रकाशदाते
बेपत्ता झालेले
लाचखाऊ रखवालदारांसारखे.
अशा अगतिक निबिडात
माझ्या पर्णकुटीतील
लहानशा थरथरत्या दीपा,
माझी सर्व भिस्त
तुझ्यावरच आहे.
अंधारावर पोसलेल्या वटवाघळांचा
चिखलात रुतलेल्या रातकिड्यांचा
दूरवरच्या जंगलातून चीत्कारणाऱ्या
कोल्ह्यांचा आणि लांडग्यांचा
आक्रोश आणि धिक्कार
तू मनावर घेऊ नकोस.
धरतीवर राहणारे असले, तरी
ते सूर्याचे नातेवाईक नाहीत.
हे नातं
तुलाच सांभाळायचं आहे,
ही भयाण रात्र
ओसरेपर्यंत.
सोनेरी केशरी धुळीने
दशदिशा व्यापीत
त्याचा ज्वालादेही अश्वांचा रथ

उद्याच्या उदयाद्रीवर आला,
की तू विझून जा
सुखेनैव.

## ओलेती

तमाढ्य गगनावरी पेटल्या
शुक्र-गुरूच्या अदम्य ज्योती।
रित्या घनांच्या तळी झोपली
विगलितवसना ओली धरती।।

शुक्र-गुरूची कामल कांक्षा
दोन दिशांतुन अधीर वाहे।
आणि धरेच्या स्वप्नदलांवर
चंद्र पुनेचा उतरत आहे।।

## नक्षत्रांनो



हे नक्षत्रांनो,
तुम्हीही
माझ्यावर अपार प्रेम केलंत.
लक्षावधी प्रकाशवर्षांच्या अंतरावर
भ्रमण करणारे
तुमचे विश्वात्मक ज्वालांचे
अगम्य विस्तार
निशिगंधाच्या प्रकाशित गुच्छासारखे
या आकाशात प्रगटले,
ते माझ्यासाठीच.
कोठल्या मैदानावर पडून
माझ्या जीवनाचा धागा
मी तुमच्या अस्तित्वाशी
बांधीत बसलो
तेव्हा–
संसारातील सारं वात्सल्य
तुमच्या दृष्टीत उमललं;
निद्रिस्त मुलाच्या कपाळावरील केस
आईनं बाजूला सारावेत
त्याप्रमाणे
माझ्या मनःस्थितीचे
सारे अस्वस्थ किनारे,
–उदासीनतेचे, उद्वेगाचे,
तत्त्वज्ञानाचे, तत्त्वशोधाचे
केव्हा देहातून द्रवणाऱ्या
शबल वासनेचे,
केव्हा मनात उजळणाऱ्या
धूसर साधनेचे–
हलक्या हाताने बाजूला सारून

तुम्हीच मला उचललंत
सहस्र प्रकाशहस्तांनी
आपल्या उराशी
आणि म्हणालात :
जगणं म्हणजे प्रेम करणं
फक्त प्रेम करणं,
मग ते जगणं तुझं असो,
आमचं असो
अथवा तुला-मला निर्माण करणाऱ्या
त्या परात्पर शक्तीचं-
परमात्म्याचं असो.

# ते म्हणाले

ते म्हणाले, खोपटे हे– याच जागी
शिल्प बांधू राजबंसी बंगल्याचे।
रान तोडूनी उभारू बागशाही
दलदलीला रूप देऊ सारसाचे।।

सर्व हे होईल, व्हावे मानतो मी
वाळवंटी श्रावणाची स्नेहधारा।
खंत एकच दलदलीवर सांडणारा
खास माझा पारखा होईल तारा।।

# चिमणी

फांदीवर चिमणी
भुरकी पांढरी
चिवचिव करते–

माझ्याकडे बघते
नभाकडे बघते
चिवचिव करते–

फांदीवर चिमणी
भुरकी पांढरी
रुमझुम नाचते
मन माझे काचते–

चिमणीची ये-जा
आकाशात असते
म्हणून तिला पुष्कळ
कळलेले असते.

## असीम

माझ्या खिडकीच्यां तावदानापासून
आकाशगंगेतील
सर्वांत दूरच्या ताऱ्यापर्यन्तचे
हे असीम निरर्थक,
कालातीत दिशातीत
निरात्म कायद्यांनी जखडलेलं,
परिणत झालं नसतं
माणसाच्या जाणिवेत,
तर, हे परमेश्वरा– परम निरर्थका–
दाराशी बसलेल्या त्या बैलासारखा
मीही राहिलो असतो
केवळ शारीर अस्तित्वाच्या
आल्हाददायक संतोषाच्या
डोहामध्ये डुंबलेला.
पण ते घडलं नाही
आणि म्हणून
या वैश्विक निरर्थकाच्या
एका अणुमात्र कोपऱ्यामध्ये
अर्थाची वसाहत
उभारण्याची जबाबदारी
माझ्यापुरती
शेवटी माझ्यावरच आहे.

# अघटित

पहाट दिसता क्षितिजावरती
विझावयाला
तयार झाला
रस्त्यावरचा
कुणी दिवा–
तोच चांदणी एक नभातिल
त्यास म्हणाली,
(का, ते केवळ जाणे ईश्वर)
थांब घडीभर
स्नेह तुझा मज
जरा हवा.

# मेघ हासती

सांध्य घनांनी
सावळलेल्या
नभी एकले
सान पाखरू
फिरते आहे।।

सूर्यास्ताचे
किरण लालसर
चोचित इवल्या
प्राणपणाने
धरते आहे।।

हताश धूसर
दिशादिशांवर
करिन लागवड
मी तेजाची
म्हणते आहे।।

मेघ हासती
परी नभाच्या
मौनावरती
कौतुकरेषा
फुलते आहे।।

# लढा

माझ्या चंद्रसूर्यांसाठी
माझे खास अंतराळ।
माझ्या मालकीचे तारे
माझ्या मालकीचा काळ।।

दिले अक्षरांनी मला
असे सार्वभौम दान।
झाले जीवनाचे माझ्या
सात स्वरांतील गान।।

आता संघर्ष हो उभा
माझे नभ नभ त्यांचे।
माझ्या चंद्रसूर्यांसाठी
आहे आता लढायचे।।

# अगतिक

मी जाणतो,
निर्मितीच्या उषःकाली
अगणित नक्षत्रांनी गजबजलेले
हे विश्व
एखाद्या विराट सहस्रदली
कमलपुष्पासारखे
रूपरंगाचे संगीत शोधत
जेव्हा अभावातून वरती आले,
तेव्हाच
त्याच्याबरोबर उगवला
अजिंक्य कायद्याचा
एक प्रचंड देठही,
न तुटणारा,
न पालटणारा;
या कायद्याच्या सार्वभौम सत्तेत
आकाशगंगेतील असंख्य सूर्यांबरोबर
आम्हीही फिरतो आहोत
एका अपरिहार्य, निर्दय
अगतिक गतीने;
या गतीलाच
आम्ही नाव दिले नियती
आणि त्या कायद्याच्या भोवती उभारले
एक संगमरवरी देवालय,
पण अखेरतः
हे आवश्यकच आहे.

## हरवणं

हे हरवणं
आता चालूच राहणार आहे.
नक्षत्रांकित
        आकाशातून
पृथ्वीच्या
        नकाशातून
स्मितांच्या
        ताटव्यांतून
स्पर्शांच्या
        मैफलींतून
कोणाच्या
        दिठीतून
कोणाच्या मिठीतून
हे हरवणं
आता चालूच राहणार आहे.
गीतांच्या
        चंद्रशालांतून
मतांच्या
        कोलाहलातून
प्रेमाच्या
        अमृताशय पाशांतून
द्वेषाच्या
        सर्पाकार रोषातून
पापणीत साकळलेल्या
        एखाद्या थेंबातून
आणि कोट्यवधी सूर्यमाला
        अंतरंगात साठवणाऱ्या
आकाशगंगेतूनही
हे हरवणं

आता चालूच राहणार आहे.

हे हरवणं
तसं लहानसंच,
महासागरातल्या जलकणासारखं,
        आणि तरीही
ते व्यापून टाकणार आहे
        अशेष विश्वाला;
        कारण हे थेंबाचं हरवणं
        कदाचित् हरवणं असेल
साऱ्या महासागराचंही.

## इशारा

सावध असा–  
सूर्य मावळला आहे  
रात्र काजळली नाही,  
आणि  
सांध्यधूलीतून  
साकारलेला  
गगनभेदी नरसिंह  
आपला खांब शोधीत  
पृथ्वीवर फिरतो आहे  
निःशब्द पावलांनी.  
कदाचित हाच तो खांब असेल,  
ज्याच्यावर तुमचे सुसंस्कृत पाय  
प्रहार करीत आहेत.

# मेणा

पहाटताऱ्यांच्या खांद्यावरून
येतो आहे एक मेणा
माझ्या दाराशी,
केशरकिरणांच्या पडद्याआड
ज्यात बसलेले असेल
एक कोकिळगाणे.

## पायवाटेवर

पृथ्वीवरील
चिखलातून चालताना
त्याचा एक पाय
पृथ्वीवरून घसरला
आणि पडला
थेट आकाशगंगेमध्ये,
महत्प्रयासाने
धडपडत
तडफडत
त्याने पाय बाहेर काढला
आणि तो पुन्हा चालू लागला.
आता
त्याच्या पावलागणिक
त्याच्या पायवाटेवर
प्रगट होत आहेत
तारकांचे पुंज.

# एकटे

असंख्य नक्षत्रांची यात्रा घेऊन
विश्व चालले आहे विश्वातूनच
आणि विश्वाकडेच,
कालहीन, दिशाहीन, निरुद्देश, अनाद्यन्त
विश्व भयाण एकटे
आपल्या विश्वपणातच.

# सवाल हा आहे

त्या दूरस्थ तारकांबद्दल
मी बोलतच नाही.
त्या तुमच्या मालकीच्या नाहीत.
हजारो प्रकाशवर्षे
दूर असलेल्या त्या ब्रह्मज्योती
केव्हा उगवतील
केव्हा मावळतील
मेघांच्या निबिड अरण्यात
केव्हा अदृश्यही होतील.

माझा सवाल आहे
तो तुमच्या मालकीच्या
तुमच्या खासगी आकाशातील
तारकांबद्दल.
त्या जर विझल्या असतील,
तर त्या दूरस्थ तारकाच काय,
पण सहस्र सूर्यही
तुमच्या मार्गावर
अमावास्याच ओतीत राहतील.

# काळोख

इतका काळोख, हे आकाशस्थांनो,
मी तुमच्याकडे कधीच मागितला नव्हता,
कधी मागितला असेल–
पसाभर,
हिरव्यालाल मांसलाच्या कर्दमाला खुपणारा
एखादा सूर्यकिरण मारण्यासाठी,
कधी मागितला असेल
अस्मानभरही
जंगलातील सर्पाकार वाटेने
रात्रिचरांच्या आश्रयाने प्रवास करताना
तारकांच्या कठोर नजरा विझविण्यासाठी,
पण इतका– आणि असा–!
माझ्याच नव्हे
साऱ्या विश्वाच्याच अस्तित्वाला
शंकास्पद करणारा...

# द्वंद्व

तत्त्वे आहेत दोनच :
माती आणि आकाश
तुमच्यांत आणि–
माझ्यातही.
माती आली पृथ्वीतून
आकाश आले अवकाशातून
एक शिरले देहात
आणि दुसरे बसले मनात.
दोघे खूपच भांडले
हिचे काळे, त्याचे निळे
रक्त थोडे सांडले
अखेर जिवात काळीनेच
प्रस्थ आपले मांडले.
आता माती खजील झाली
तिचे काळे करडे कण
आकाशाच्या सांदीत जाऊन
धरतात त्याचे निळेपण.

# खाजगी

त्याच आकाशाने
मला जन्म दिला,
हे मी नाकारीत नाही
पण माझे हे आकाश
तसे खाजगी
अगदीच खाजगी आहे.
येथेही होतात
चंद्रसूर्यांचे उदयास्त
लखलखतात अगणित तारकांचे उन्मेष,
अस्तित्व गोठवणाऱ्या हिमलाटा
आणि क्षितिजापर्यंत पसरलेल्या
अक्राळविक्राळ अमावास्या;
पण तेही सारे
खाजगीच.
माझे हे आकाश
शेवटी मिळून जाणार आहे
त्याच विशाल आकाशात,
हेही मला माहीत आहे.
पण तेव्हा देखील
आणि त्यानंतर कधीही
त्याला कळणार नाही
माझ्या या आकाशाने
काय भोगले
काय सोसले
काय अनुभवले.

## पालखी

पहाटच्या तिमिरात दूरवर कुठल्या देवालयी
घंटा निनादते आहे
त्या स्वरलहरींच्या स्कंधावर लाल पालखी ही
कुणाची हेलावत राहे!

मम नगराच्या वेशीवरती रत्नदिव्यांच्या या
अचानक झगमगल्या माला
काळोखावर कनकफुलांचे उलगडले गालिचे
पथावर किनारल्या ज्वाला.

नीरवतेच्या गहन धुक्यातुनि रुणझुणल्या तारा
स्वरांकुर क्षितिजाला फुटले
धवलनील फुलवूनि पिसारा व्योमनदीच्या तटी
नाचती नक्षत्रांची दले.

अशा वैभवामधून मिरवित दिव्य पालखी ती
येतसे माझ्या दारावरी
किनखापी पडद्यातुनि प्रकटे स्वर्णशलाकेपरी
सकंकण हात कुणाचा तरी!

# वसा

द्वेषाच्या
निखारलेल्या ढगांचं स्वागत
मी अनेकदा केलं आहे
–अजूनही करीन
त्यांतून बरसणाऱ्या
तांबड्यालाल दाहक धारा
मी आवेगानं
अंगावर घेतल्या आहेत.
–अजूनही घेईन.
पण पृथ्वीच्या मातीतून
वाहणाऱ्या द्वेषाच्या पाणलोटांनी
जर अखेर घेतला नाही
वसा त्या मातीचा
प्रेमाचा,
तर माणसाचं नातं तुटेल
पृथ्वीशी आकाशाशी,
आणि तो लोंबू लागेल निराधार
त्रिशंकूसारखा
एका भेसूर निरालंबात.

# तारका

तुझिया तांबूस तेजाची ज्योत
देखता आकाशी निरभ्र नील
जननांतरीचे अंतरी गूढ
सौहृद उमले सुगंधशील!

अपार अंतर जोडून तुझे
प्रकाशकिरण धरतीवरी
येतात शोधत हृदय माझे
घरात येणाऱ्या पाखरापरी!

रुपेरी पिसांची रचती शेज
माझिया श्रमल्या हृदयासाठी
प्रकाश-पुष्पांचे गुंफती हार
माझिया उदास अंधारासाठी!

स्नेहाचे रहस्य आपुल्या असे
निद्रिस्त जगास ठाऊक नाही
सस्मित होऊन आकाश मात्र
मीलन आपुले पाहत राही!

# आकाश

होता धरा ही पारखी
जावे, नभा, कोणीकडे
तुझिया घरातच, वत्सला,
हृदयास सांत्वन सापडे.

होती कथा तुज माहिती
होते इशारे तू दिले
नीलार्त लोचन तेधवा
होते तुझे पाणावले.

थोरीव की ना बोलता
ओढून घेसी तू उरी
देशी उसे ज्वलनास या
त्या चंदनी चंद्रावरी.

# आकाशनील

मीलनलालसा तर
देहवान असतेच,
पण देहदेखील
आपण समजतो, तितका
देहवान नसतो.
माणसाचं अपार्थिव चैतन्य
सृष्ट जीवनातून
ब्रह्मकमलासारखं उमललं,
तेव्हाच स्त्री-पुरुषप्रेमाला
विश्वातील परम सुंदराचं
सिंहासन लाभलं.
आपण ते विद्रूप करतो
त्याला जनावरी पातळीवर नेऊन,
पशूच्या कातडीत
अनात्म देहाचं विसर्जन करून.
पण हे मीलन
जर तसं नसेल
केवळ त्वचेशी बांधलेलं,
तर देहात उगवणारा
प्रत्येक स्पर्शही
देहातच विदेही होईल,
परस्परांच्या आंतरिक अस्तित्वात
एकात्म होण्यासाठी
आसावलेला.
हे एक अवकाशातील
नक्षत्रांचं आकाशनील नातं
पृथ्वीच्या अपत्यांपर्यंत
पोचलेलं.

## गहन एकता

अस्तरवीची
एक पाकळी
सांध्य घनांच्या
जंगलामध्ये
जळते आहे
त्या तेजाची
गहन एकता
इथे किनाऱ्या-
वरती मजला
कळते आहे.

# सूर्यपुत्र

बाप नसलेल्या
साऱ्या अनौरस अपत्यांमध्ये
मी आहे– सर्वश्रेष्ठ
सूर्यपुत्र,
सूर्य आणि पृथ्वी यांच्यांतील
एका अज्ञात संकेतातून
आकारलेला.

होय– मला जन्म दिला असेल
कोणा पुरुषाच्या वीर्याने
पण गर्भाशयातील काळोखात
लज्जास्पद होऊन पडलेले
ते अस्तित्व
लाख पाकळ्यांनी साकार झाले
तेजोमय झाले
ते तुमच्या व्यवहाराबाहेर असलेल्या
सूर्याच्या आशीर्वादाने
आणि धरतीच्या मायेने.

म्हणून
तेच कायदे मी मानतो
ज्यांचा उगम
माणसात वा
माणसांच्या समूहात नव्हे,
तर सूर्याच्या प्रकाशात
आणि पृथ्वीच्या मायेत
झाला आहे
फक्त तेच.

•

# आकाशकन्या

आपुले रहस्य–
आपुल्यासाठी!
दूरस्थ तारका आकाशकन्या तू
स्वर्गीय नदीच्या किनाऱ्यावरी
मेघांच्या कुंजाशी
एकान्त बाजूला नभी
एकटी उभी!
अमर वेलीचे प्रफुल्ल कुसुम
अमल दलांची
उघडे मंजूषा
सुनील हिमानी परागांतुनी
पसरे तमात
प्रकाशगंध!

❀ ❀ ❀

चालता रात्रीला एकाकी वाट
काळोख दाट–
सभोती साचला धरित्रीवरी
गिळून रंग अन् आकार सारे!
दूरस्थ तारे
दूरच आकाशी अज्ञेयापरी
त्यातील तूहि
परंतु तरीहि
वाटले, रत्नांचा घेऊन दिवा
आकाशगृहाच्या दारात उभी
माझ्याचसाठी
देवता कोणी!

❀ ❀ ❀

आभास सारा, स्वप्नच मिथ्या
ज्ञानास जाणीव–
वेगळी विश्वे अन् वेगळे धर्म
आपणां दोघांचे.
खगोलशास्त्रज्ञ सांगती इथे
अमित अंतर आपुल्यामध्ये
प्रकाशवर्षांचे!
तुझिया रूपात अपार अग्नी
फिरत राहे, ठाऊक आहे,–
परंतु गाजवी कल्पना आज
हृदयी राज्य
कल्पना-कोषात ज्ञान हो कैद
आणिक एकाच घटकेसाठी
अंतर तुटून, भिन्नता लोपून
निशेच्या अंधेऱ्या मांडवामध्ये
आपण एक!

# अस्तानंतर

जाणतो मी अस्तकाली
या नभाचे सत्त्व सारें
मावळे सूर्यासवे.

जाणतो की धूसरावर
वाहती खंग सांजवेळी
ती नभाची आसवे.

गर्द झाडांच्या तळाशी
सावल्या हलती, नभाच्या
भीतिचे थरकाप ते.

वादळे करती जळावर
वा गुहेतुन नाद भीषण
हुंदके आलाप ते.

जाणतो या मध्यरात्री
जी तमावर प्रकट होते
तारकांची संपदा.

या नभाचा या तमाचा
तो प्रकाशाशी उद्याच्या
एक दुर्दम वायदा.

## गिधाडे

आभाळ
लालभडक
रक्ताळ मांसखंडांनी
खचलेले–
आणि
जमिनीवर
त्या आकाशाकडे
एकटक पाहणारी
गिधाडे–
निश्चल
असंख्य
या क्षितिजापासून
त्या क्षितिजापर्यंत.

# पाहुणा

काळोखाच्या घरी
प्रकाश पाहुणा
कळे ना कवणा
काय द्यावे घ्यावे.

द्यावे आलिंगन
तरी नुरे देह
स्पर्शही दुःसह
होई परस्परा.

भाषा भिन्न, कसे
पुसावे कुशल
अशब्द अचल
दूर दोघे उभे.

अखेर जाताना
प्रकाश वदला
सांजपहाटेला
भेटू जरा वेळ.

# सूर्य

सूर्य लाडका आला माझा
लखलखणारा किरीट माझ्या
विश्वघराचा,
प्रकाशदाता जीवनदाता
चिर सांगाती या एकाकी
मुशाफिराचा.

सूर्य सदाशिव आला माझा
रूपनगर तो रोज बांधतो
माझ्यासाठी,
युगायुगांची जीवनरेषा
जीवनास मम जोडुन देतो
तो जगजेठी.

रात्र मला ज्या तळ्यात टाकुन
नग्नपणाने निघून गेली
त्यातुन वरती
तटावरी आणून तयाने
पुन्हा दिले मज दिगंत माझे
माझी धरती.

# देणं

मातीपण
        मिटता मिटत नाही
आकाशपण
        हटता हटत नाही;
        आकाशमातीच्या
        या संघर्षात
माझं जखमांचं देणं
फिटता फिटत नाही.

## चांद माझा–

चंद्र तुमचा वेगळा जो अंतराळी राहतो
चंद्र माझा अंतरीचा मीच केवळ पाहतो.
दीन तो शास्त्रापुढे सामंत होउनि वाकला
श्वान याने माकडे इत्यादिकांनी झाकला.
मार्गदीपक पालिकेच्या तो दयेवर लोंबतो
कीटपंखांचा जथा ज्योतीस त्याच्या झोंबतो.
जाणत्यांचा हा जमाना, रूप त्याचे देखती
हास्य त्याचे, लास्य त्याचे टेबलावर जोखती.
चांद माझा वेगळा खाविंद हा तख्तावरी
ज्ञानविज्ञाने तयाची स्पर्शती ना पायरी.
भाव माझे, गीत माझे, रंग जे मी रेखतो
राजवाडे त्यांत बांधुन राहतो सुखरूप तो.
तो तळ्यावर डुंबतो, दर्याकिनारी हिंडतो
चुंबनाने झाकल्या नेत्रांतुनी ओसंडतो.
हात देतो तो व्यथेला, साथ देतो सुंदरा
तो मनोगत ईश्वराचे सांगतो या नश्वरा.
येउ द्या आकाशयाने वर्षु द्या श्वानावळी
दिग्‌फुलाची या न केव्हा भ्रष्ट होइल पाकळी.

## उंबरठ्यावर

सायंकाळी
उषःकालचे तांबूस किरण
कोणी तरी आणून ठेवले
माझ्या उंबरठ्यावर.
आता ते गुजगोष्टी करीत आहेत
तेथे असलेल्या
सायंकालीन किरणांबरोबर.
उषःकालचे किरण म्हणाले,
आम्हांला सूर्याचे आश्वासन आहे,
सायंकालचे किरण उत्तरले,
आम्हांला चंद्राचे सांत्वन आहे.

# हे गगना

हे गगना, तू माझ्या गावी
आणि तिच्याही गावी
तुला, उदारा, पहिल्यापासुन
सर्व कहाणी ठावी.

अशी दूरता अपार घडता
एक तुझीच निळाई
अंतरातही एकपणाचे
सांत्वन जगवित राही.

घन केसांतुनि तिच्या, अनंता
फिरवित वत्सल हात
सांग तिला की, दूर तिथेही
जमू लागली रात.

# अपार नभ हे

अपार नभ हे माथ्यावरती
असंख्य वारे त्यावर तरती
सहारातल्या रेतीचा कण
तशी तेवढी माझी धरती.

कणावरी या हजार सीमा
मीच कल्पतो, मीच रेखतो
शून्यामधल्या शून्यास्तव मी
एक शून्य रखवाली करतो.

घनांध जंगल द्वेषाचे मी
सीमारेषांवर पेटवतो
वत्सल मातीवर मरणाच्या
वसाहती मी पेरित जातो.

असा पराक्रम पाहुनि माझा
गगन निराशय हसते आहे
परि सूर्याच्या नयनि धरेस्तव
अश्रूंचे जल जमते आहे.

# शलाका

अब्जावधी रवींच्या
माळा गळ्यात ज्याच्या
दिवलीतल्या दिठीने
त्याला कसे पहावे?



गगनापरी जगावे
मेघापरी मरावे
तीरावरी नदीच्या
गवतातुनी उरावे



मी चोरल्या रवीच्या
काही प्रकाशधारा
तिमिरात शक्य झाली
इतुकीच रोषणाई

# मोर

चंद्र कलंडला, तरी
रात्र वेल्हाळत आहे.
फांद्यांतून जळावर
स्वप्न निथळत आहे.

मैफलीच्या अखेरीला
उभी कोपऱ्यात वीणा
तारांतून तरी मंद
गीत पाझरत आहे.

सोस, जीवना, हा किती
अस्तित्वाच्या सीमेवर
पंखहीन लालसेचा
मोर आरवत आहे.

# संध्या

उषा सुंदर होतीच
पण अधिक सुंदर आहे
ही संध्या.
हा सूर्य
मावळतीवर उतरलेला
दिवसभरच्या प्रकाशदानाने
कृतार्थ झालेला
अधिक स्नेहशील, अधिक प्रकाशमय.
निर्वाहासाठी
आकाशात प्रवेशणाऱ्या
क्षुधित पाखरांपेक्षा
तृप्त संतोषाने, जंगलाकडे
परतणारी ही पाखरं
अधिक आनंदमय.
आणि मी माझे अस्तित्व
प्रकाशात प्रवेश करताना
पूर्ण निराशय असलेले
आता अंधारात विश्रांत होताना
सर्वंकष आशयाने
शिगोशिग भरलेले
असण्याचे उन्नयन
जगण्यात करणारी
ही संध्या.

## करार

खूप खूप वर्षांपूर्वी
आकाशाशी
माझा करार झाला
आणि आकाशगंगेतील
ती छोटी तारका,
निळ्या-पारव्या प्रकाशाचा
पिसारा फुलवणारी,
माझ्या मालकीची झाली.
तेव्हापासून
पृथ्वीवर जेव्हा
ज्वालामुखीच्या उद्रेकांनी,
उसासलेली उद्यानं
दग्ध होतात,
किंवा कोकिळांची कूजनं
बर्फाच्या प्रपातात
गोठून मरून पडतात,
तेव्हा
माझा निवास
त्या तारकेवरच असतो,
व्यवहारापुरता
मी येथे
वावरत असलो, तरी.

कुसुमाग्रजांची प्रस्तुत कविता
आकाशातील चिरंतन ज्योतींची उज्ज्वल गाथा आहे.
एकाच विराट तेजाचे हे भिन्न-भिन्न आविष्कार.
यातील सूर्य हा त्यांच्या काव्याकाशात मध्यवर्ती आहे.

सूर्यकल्पनेने त्यांचे मन झपाटलेले आहे.
हा सूर्य त्यांच्या काव्यात अत्यंत आशयघन प्रतीक बनला.
त्याचे उदयास्त हे त्यांच्या शब्दविश्वात
केवळ निसर्गघटना राहिले नाहीत,
तर मानवाच्या उत्थान-पतनाचे, आशा-निराशांचे द्योतक बनले.
कुसुमाग्रजांचा सारा भर दीप्तीवर आहे, उधाणावर आहे.
सूर्याचे अरुण-मंगल व प्रखर तेज,
चंद्राचे शीतल पारिजातकी चांदणे, तारकांची मंद आश्वासक प्रभा,
मौनातून बोलणाऱ्या आकाशाची शांतिप्रद गहननीलता
व नितळ निर्लेपता यांचे एकत्रित दर्शन रसिकाला
त्यांच्या काव्यातून घडते.

**मेहता पब्लिशिंग हाऊस**

